# महाराष्ट्र विधानपरिषद

## पहिले (अर्थसंकल्प) अधिवेशन, २०१८

---

## अतारांकित प्रश्नोत्तरांची यादी

**प्रश्नांची एकूण संख्या - ५०**

---

**अपंग शिक्षक व शिक्षकेतर कर्मचाऱ्यांना अतिरिक्त व बदली प्रक्रियेतून वगळण्याबाबत**

**(१) ८१९९ (०४-०८-२०१५). श्री.दत्तात्रय सावंत :** सन्माननीय **शालेय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) खाजगी व्यवस्थापनाच्या शाळांच्या अतिरिक्त ठरलेल्या शिक्षक व शिक्षकेतर कर्मचाऱ्यांमध्ये अपंग शिक्षक व शिक्षकेतर कर्मचाऱ्यांचा समावेश झाला आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, अशा अपंग शिक्षक व शिक्षकेतर कर्मचाऱ्यांना अतिरिक्त व बदली प्रक्रियेतून वगळण्यासाठी शासन सवलत देणार आहे काय,

(३) असल्यास, याबाबत शासनाची भूमिका काय आहे ?

**श्री.विनोद तावडे (०१-०२-२०१८) :** (१) होय, हे खरे आहे.

(२) व (३) सद्य:स्थितीत विचाराधीन नाही.

---

**राज्यातील महानगरपालिका, नगरपरिषद क्षेत्रातील अपंगांना त्यांना मिळणाऱ्या योजनेचा लाभ मिळण्याबाबत**

**(२) ११०३२ (२३-१२-२०१५). प्रा.अनिल सोले, श्री.नागोराव गाणार, श्री.मितेश भांगडिया, श्री.चंद्रकांत रघुवंशी, प्रा.जोगेन्द्र कवाडे, श्री.संजय दत्त** : सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्य शासनामार्फत अपंग बांधवांकरीता अनेक प्रकारच्या अनेक योजना राबविण्यात येत असूनही याची माहिती महानगरपालिका, नगरपालिकाकडे उपलब्ध नसल्यामुळे योजनांचा निधी विनावापर पडून असल्याचे दिनांक २३ ऑगस्ट, २०१५ रोजी वा त्यासुमारास निदर्शनास आले, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, शहरातील अपंगाची नोंद महानगरपालिका, नगरपालिका, नगरपरिषद व नगरपंचायतीमध्ये करण्यात यावी अशा सूचना नगरविकास विभागाने दिनांक ४ एप्रिल, २०१३ रोजी वा त्यासुमारास देऊनही या सूचनांकडे दुर्लक्ष केले जात असल्याचे निदर्शनास आले, हे ही खरे आहे काय,

(३) तसेच, उपरोक्त सुचनेनुसार किती महानगरपालिका, नगरपरिषद, ग्रामपंचायत यांनी अशी नोंद घेतली व त्यानुसार सध्या किती अपंगाची नोंद घेण्यात आली आहे,

(४) असल्यास, उपरोक्त प्रकरणी अपंगासाठी असणाऱ्या शासनाच्या विविध योजनांची माहिती तात्काळ अपंगांना मिळण्याबाबत शासनाने काय कार्यवाही वा उपाययोजना केली आहे,

(५) तसेच अपंगांना या योजनेचा लाभ न पोहोचविणाऱ्या संबंधित अधिकारी/कर्मचारी यांचेवर शासनाने काय कारवाई केली वा करण्यात येत आहे,

(६) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहे ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (२९-०१-२०१८)** : (१) हे खरे नाही.

(२), (३) व (४) दिव्यांग बांधवांची नोंदणी करण्यासाठी सर्व महानगरपालिका/नगरपरिषदा तसेच नगरपंचायतींना दिनांक ०४/१०/२०१३ च्या परिपत्रकान्वये सूचना देण्यात आलेल्या आहेत. तसेच सदर सूचनांचे काटेकोरपणे पालन करण्यासाठी दिनांक २०/०८/२०१५ च्या शासन परिपत्रकान्वये सर्व

संबंधितांना कळविण्यात आले आहे. त्यास अनुसरून महानगरपालिका/ नगरपरिषदा/नगरपंचायतींमध्ये दिव्यांग बांधवांची नोंद घेण्यात येते.

दिव्यांग बांधवांसाठी ३% निधी राखीव ठेवण्याबाबत शासन परिपत्रक दिनांक ३०/१०/२०१० अन्वये सर्व महानगरपालिका/नगरपरिषदा/ नगरपंचायत यांना सूचना देण्यात आलेल्या असून, सदर निधी कोणत्या प्रयोजनार्थ खर्च करावा, याबाबत सविस्तर मार्गदर्शक सूचना निर्गमित केलेल्या आहेत. सदर निधी इतर प्रयोजनार्थ न वळविण्यासाठी तसेच त्या-त्या वर्षातच खर्च करण्याबाबत सूचना दिलेल्या आहेत.

दिव्यांग बांधवांच्या विविध योजनांचे अनुषंगाने प्रत्येक नागरी स्थानिक संस्थेने कार्यशाळा आयोजित करण्याचे सर्व संबंधितांना दिनांक २८/१२/२०१७ रोजी कळविले आहे.

(५) दिव्यांग बांधवांना राखीव निधी खर्च करण्यास कसूर करणाऱ्या/इतर प्रयोजनार्थ खर्च करणाऱ्या अधिकाऱ्यांविरुद्ध शिस्तभंगविषयक कार्यवाही करण्याची दिनांक १४/११/२०१७ च्या परिपत्रकान्वये तरतूद केलेली आहे.

(६) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

**राज्यातील आरटीओ कार्यालयातील पीयुसी मशीन व हेडलाईट एन्लायझर मशीन वापराअभावी पडून असल्याबाबत**

**(३) १४२९२ (२१-१२-२०१५). श्रीमती स्मिता वाघ** : सन्माननीय **परिवहन मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यातील रस्त्यावर धावण्यास अवजड व व्यावसायिक वाहन सक्षम असल्याची तपासणी करण्यासाठी सर्व आरटीओ कार्यालयांना सुमारे अडीच कोटी रुपयांची १२० पीयुसी मशीन तसेच ५० हेडलाईट एन्लायझर मशीन पुरविण्यात आली असून मात्र या मशीन्सचा वापर कार्यालयांनी केलेला नाही, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, तद्नुसार कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.दिवाकर रावते (२५-०१-२०१८) :** (१), (२) व (३) हे खरे नाही.

सन २००० ते २०१५ पर्यंत केंद्र शासनामार्फत वाहनांची वायु प्रदुषणाची तपासणी करण्यासाठी १२० पीयुसी मशीन तसेच ५० हेडलाईट एन्लायझर मशीन प्राप्त झालेली नसून ११८ गॅस एन्लायझर व १६८ स्मोक मीटर पुरविण्यात आले आहेत. सन २०१० पासून भारत स्टेज-४ ही वायु प्रदुषणाचे मानके लागू आहेत. वायू प्रदुषण विषयक सुधारित मानकांनुरुप पूर्वी केंद्र शासनाने पुरविलेल्या मशीन्स कालबाहय झालेल्या आहेत.

मे.मॅनाटेक इलेक्ट्रॉनिक प्रा.लि. यांच्याकडून ५० स्मोक मीटर केंद्र शासनाच्या अनुदानातून प्राप्त झाली आहेत. सदर यंत्रांचे वाटप ५० परिवहन कार्यालयांना करण्यात आले आहे. सदर कंपनीकडून मोटार वाहन निरीक्षक यांना सदर यंत्र हाताळणीचे CIRT, पुणे येथे प्रशिक्षण देण्यात आले आहे.

राज्यातील १७ कार्यालयात स्मोक मीटर इन्स्टॉलेशन पूर्ण झाले आहे.

केंद्र शासनाकडून ५० गॅस एन्लायझर मशीन अद्याप प्राप्त नाहीत.

---

## राज्यातील विद्यार्थ्यांना पहिलीच्या वर्गातच जातीचे दाखले देण्याबाबत

**(४) १८५५५ (२७-०४-२०१६). श्री.जयवंतराव जाधव, श्री.नरेंद्र पाटील, श्री.धनंजय मुंडे, श्री.सुनिल तटकरे, श्री.किरण पावसकर, ॲड.निरंजन डावखरे, श्री.अमरसिंह पंडित, श्रीमती विद्या चव्हाण, श्री.आनंद ठाकूर, ॲड.राहुल नार्वेकर, ॲड.जयदेव गायकवाड, श्री.ख्वाजा बेग, श्री.हेमंत टकले, श्री.सतिश चव्हाण, श्री.अब्दुल्लाखान दुर्राणी, श्री.विक्रम काळे :** सन्माननीय **सामाजिक न्याय मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यातील विद्यार्थ्यांना पहिलीच्या वर्गातच जातीचे दाखले देण्याचे शासनाच्या विचाराधीन आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, सदर योजनेचा तपशील काय आहे, व उक्त निर्णय घेण्यासाठी शासनामार्फत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(३) अद्याप कोणतीही कार्यवाही केलेली नसल्यास विलंबाची कारणे काय ?

**श्री.राजकुमार बडोले (०३-०१-२०१८) :** (१) व (२) हे खरे नाही.

तथापि, राज्यात दिनांक ०१/०८/२०१५ पासून महाराजस्व अभियान राबविण्यात येत आहे. सदर अभियानांतर्गत शाळांमध्ये विशेष शिबिरे आयोजित करुन जातीचे दाखले देण्याचे उपक्रम दरवर्षी आयोजित करण्यात येतात.

सदर अभियानांतर्गत राज्यात सन २०१५-१६ मध्ये २,८४,५८१ जातीचे दाखले व सन २०१६-१७ मध्ये ३,७०,८७६ जातीचे दाखले असे एकूण मागील दोन वर्षात ६,५५,४५७ इतके जातीचे दाखले वितरीत करण्यात आलेले आहेत.

(३) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

**पाटोदा, थडी व कुंडलवाडी (ता.बिलोली, जि.नांदेड) येथील शेतकऱ्यांना पीक कर्ज उपलब्ध करुन देण्याबाबत**

**(५) १९९५९ (१६-०८-२०१६). श्री.अमरनाथ राजूरकर :** सन्माननीय **सहकार मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) पाटोदा थडी व कुंडलवाडी (ता.बिलोली, जि.नांदेड) येथील शेतकऱ्यांना मागील एक वर्षापासून पीक कर्ज देण्यास टाळाटाळ करत असलेल्या महाराष्ट्र ग्रामीण बँकेच्या कर्मचाऱ्यांच्या आडमुठे धोरणाविरोधात परिसरातील शेतकऱ्यांनी सामुहिकरित्या आत्मदहन करण्याचे निवेदन दिले असतानाही बँकेने कोणतीही कार्यवाही केली नसल्याचे निदर्शनास आले, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, त्याबाबत शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.सुभाष देशमुख (०५-०१-२०१८) :** (१) होय, असे निवेदन प्राप्त झाले होते. आत्मदहन आंदोलन, पीक कर्ज पुनर्गठन व नवीन कर्ज वाटपाचे आश्वासन मिळाल्यामुळे स्थगित केले.

(२) महाराष्ट्र ग्रामीण बँक, कुंडलवाडी यांनी २०१५ या वर्षात पाटोदा थडी येथील ४० सभासदांपैकी ३३ सभासदांना एकूण रुपये २०.४६ लाख पीक कर्ज वाटप केले असून २०१६ या वर्षातील खरीप हंगामामध्ये ४० सभासदांपैकी १२ सभासदांना

कर्जवाटप केले आहे, ७ सभासद पुनर्गठनास पात्र नव्हते. उर्वरीत २१ खातेदार शेतकऱ्यांची मागणी प्राप्त झाली नव्हती.

कुंडलवाडी हे गाव महाराष्ट्र ग्रामीण बँकेच्या दत्तक यादीमध्ये नाही. कुंडलवाडी येथे एकूण तीन बँक शाखा असून त्यांनी खरीप २०१६ मध्ये एकूण ११७३ सभासदांना रुपये ९४२.६२ लाख पीक कर्ज वाटप केले आहे. सन २०१५ मध्ये थकबाकीदार असलेल्या उर्वरीत पात्र सभासदांना पुनर्गठनाचा लाभ दिला जात असल्याचे सहकार आयुक्त व निबंधक, पुणे यांनी कळविले आहे.
(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

## मराठवाड्यासह राज्यात अवकाळी पावसामुळे नुकसानग्रस्त शेतकऱ्यांना तसेच वीज पडून मृत पावलेल्यांच्या कुटुंबियांना आर्थिक मदत देण्याबाबत

**(६) २१३१२ (१९-०८-२०१६). श्री.आनंद ठाकूर, श्री.हेमंत टकले, श्री.ख्वाजा बेग, श्री.नरेंद्र पाटील :** सन्माननीय **मदत व पुनर्वसन मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) मराठवाड्यासह राज्यात अवकाळी पाऊसामुळे पिकांचे व फळांचे मोठ्या प्रमाणात नुकसान झाल्याचे तसेच, धुळे जिल्ह्यात अंगावर वीज पडून दोन जणांचा मृत्यू झाल्याची घटना घडल्याचे माहे मे, २०१६ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले व तद्नुसार नुकसानग्रस्त शेतकऱ्यांना तसेच वीज पडून मृत पावलेल्यांच्या कुटुंबियांना आर्थिक मदत देण्याबाबत शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.चंद्रकांत पाटील (११-०१-२०१८) :** (१) मराठवाड्यासह राज्यात अवकाळी पावसामुळे पिकांचे व फळांचे नुकसान झाल्याचे तसेच धुळे जिल्ह्यात अंगावर वीज पडून तीन जणांचा मृत्यू झाल्याची घटना घडल्याचे माहे मे, २०१६ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले आहे.

(२) शासन निर्णय, महसूल व वन विभाग, दिनांक २३ मे, २०१७ अन्वये, राज्यात माहे एप्रिल ते मे, २०१६ व नोव्हेंबर, २०१६ या कालावधीत झालेल्या अवेळी पाऊस व गारपीटीमुळे बाधित शेतकऱ्यांना पीक नुकसानीवर मदत देण्याबाबत धोरणात्मक निर्णय घेण्यात आलेला आहे.

तसेच शासन निर्णय, महसूल व वन विभाग, दिनांक १३/०५/२०१५ मधील तरतूदींनुसार माहे एप्रिल-मे, २०१५ मध्ये वीज पडून मृत्यू झालेल्या व्यक्तींच्या नातेवाईकांना नियमानुसार मदत देण्यात आलेली आहे.

(३) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

**लातुरच्या ऑल्मपिक विजेत्या मुकबधिर तरुणाने मिळावलेली ५० पदके शासकिय नोकरी न मिळाल्याने परत करण्याचा घेतलेला निर्णय**

**(७) २१९०८ (२३-०८-२०१६). श्रीमती विद्या चव्हाण, श्री.किरण पावसकर :** सन्माननीय **क्रीडा मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) लातुर मधुन आलेल्या अन्वर शेख या मुकबधिर तरुणाने २०१५ साली झालेल्या स्पेशल ऑल्मपिकमध्ये मिळविलेले विजेतेपदाचे पदकासहित इतर ५० पदके, अपंग राखीव कोट्यातून त्याला नोकरी मिळत नाही, याकरिता परत देण्याचा सत्याग्रह मुंबईच्या आझाद मैदानामध्ये दिनांक २२ मार्च, २०१६ रोजी वा त्यासुमारास केला होता, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उपरोक्त प्रकरणी चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले व तद्‌नूसार ऑल्मपिकमध्ये पदके मिळविणाऱ्या अपंगास शासकिय नोकरी देणेबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.विनोद तावडे (०१-०२-२०१८) :** (१) व (२) या अनुषंगाने कोणतेही निवेदन या विभागात अद्याप प्राप्त झालेले नाही.

(३) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## यवतमाळ येथील सावित्री ज्योतीराव समाजकार्य महाविद्यालयातील प्राध्यापक व शिक्षकेतर कर्मचाऱ्यांना सहाव्या वेतन आयोगाच्या फरकाची रक्कम अदा करण्याबाबत

**(८) २१९४१ (१९-०८-२०१६). श्री.ख्वाजा बेग, श्री.श्रीकांत देशपांडे :** सन्माननीय **सामाजिक न्याय मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) यवतमाळ येथील सावित्री ज्योतीराव समाजकार्य महाविद्यालयातील प्राध्यापक व शिक्षकेतर कर्मचाऱ्यांना अद्याप सहाव्या वेतन आयोगाच्या फरकाची रक्कम मिळाली नसल्याचे माहे मे, २०१६ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, याबाबत शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.राजकुमार बडोले (०३-०१-२०१८) :** (१) होय.

(२) सहाव्या वेतन आयोगाच्या फरकाच्या रक्कमेबाबत प्राप्त तरतूदीतून यवतमाळ जिल्ह्यातील सावित्री ज्योतीराव समाजकार्य महाविद्यालय येथील कर्मचाऱ्यांना नियमानुसार अदा करण्याची कार्यवाही करण्यात येत आहे.

(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

## सोलापूर जिल्हयातील प्राथमिक व माध्यमिक अनधिकृत शाळांवर कारवाई करण्याबाबत

**(९) २२३०३ (२३-०८-२०१६). श्री.आनंदराव पाटील, श्री.संजय दत्त :** सन्माननीय **शालेय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) सोलापूर जिल्हयात प्राथमिक व माध्यमिक मिळून २७ शाळा अनधिकृत असल्याचे माहे एप्रिल, २०१६ मध्ये निदर्शनास आले, हे खरे आहे काय,

(२)असल्यास, अनधिकृतपणे शाळा चालविणाऱ्या संस्थाचालकांवर कारवाई करण्याबाबत तसेच या शाळेतील विद्यार्थ्याचे शैक्षणिक नुकसान होऊ नये

यासाठी शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.विनोद तावडे (०८-०१-२०१८) :** (१) अंशत: खरे आहे.
(२) व (३) बालकांचा मोफत व सक्तीचा शिक्षणाचा अधिकार अधिनियम, २००९ मधील नियम १५(५) नुसार अनधिकृत शाळेवर कारवाई करणेचे आदेश गट शिक्षणाधिकारी यांना देण्यात आले आहेत. तसेच अनधिकृत शाळेतील विद्‌यार्थ्यांचे समायोजन अधिकृत शाळेत करणेचे सूचना दिलेल्या आहेत.

---

## विरार येथे खाजगी मालकीची जमीन शासकीय दाखवुन एचडीआयएल कंपनीने रेंटल हौसिंग स्कीम या योजनेची परवानगी घेतल्याबाबत

**(१०) २३८९० (०४-०१-२०१७). श्री.धनंजय मुंडे, श्री.अमरसिंह पंडित, श्री.जयवंतराव जाधव, श्री.नरेंद्र पाटील, श्री.हेमंत टकले :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) विरार येथे खाजगी मालकीची जमीन शासकीय दाखवुन एचडीआयएल कंपनीने रेंटल हौसिंग स्कीम या योजनेची परवानगी घेतल्याबाबत सन २०१६ च्या पावसाळी अधिवेशनात विधानसभा तारांकित प्रश्न क्रमांक ५४२१२ अन्वये उपस्थित केलेल्या प्रश्नासंदर्भात कोणतीच कार्यवाही झाली नाही, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, उपरोक्त प्रकरणात शासनाकडे तक्रार प्राप्त झाल्यानंतर सदर प्रकरणाचा अहवाल वसई-विरार महानगरपालिका व नगररचना संचालनालयाकडुन मागविला आहे असे मा.मुख्यमंत्री यांच्या उत्तरात नमुद करण्यात आले होते, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, सदर अहवाल प्राप्त झाला नसून त्यानुषंगाने शासनामार्फत कोणतीही कारवाई करण्यात आलेली नाही, हे ही खरे आहे काय,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (२९-०१-२०१८) :** (१) हे खरे नाही.

(२) व (३) एचडीआयएल कंपनीच्या रेंटल हौसिंग संदर्भात नगर विकास विभागाच्या नगर रचना कार्यासनाने (नवि-१) वसई-विरार शहर महानगरपालिका व संचालक, नगर रचना यांचेकडून अहवाल मागविला असून सदर अहवाल अद्याप अप्राप्त आहे.

सदर अहवाल प्राप्त झाल्यानंतर कार्यवाही प्रस्तावित आहे. तसेच सदर प्रकरणी मा.उच्च न्यायालयात जनहित याचिका दाखल असून प्रकरण न्यायप्रविष्ठ आहे.

(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

**राज्यातील समाजकल्याण विभागातील अधिकारी**
**व कर्मचाऱ्यांच्या मागण्यांबाबत**

**(११) २४१२८ (१६-१२-२०१६). श्री.हेमंत टकले, श्री.किरण पावसकर, श्री.नरेंद्र पाटील, श्री.प्रकाश गजभिये :** सन्माननीय **सामाजिक न्याय मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यातील समाजकल्याण अधिकारी व कर्मचाऱ्यांनी दहा विविध मागण्यांसाठी दिनांक १२ ऑगस्ट, २०१६ रोजी वा त्यासुमारास लेखणी बंद आंदोलन केले होते, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, सदर मागण्यांपैकी कोणत्या मागण्या मान्य करण्यात आल्या व उर्वरित मागण्याबाबत शासनाने काय कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.राजकुमार बडोले (०५-०१-२०१८) :** (१) होय.

(२) सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागाच्या क्षेत्रियस्तरावरील अधिकारी व कर्मचारी यांच्या विविध मागण्यांच्या अनुषंगाने मा.मंत्री (सा.न्या.) यांच्या अध्यक्षतेखाली अधिकारी व कर्मचारी यांच्या प्रतिनिधींसोबत दिनांक १६/०९/२०१६ रोजी बैठक आयोजित करण्यात आलेली होती. सदर मागण्यांचे अनुषंगाने आवश्यक कार्यवाही करण्यात येत आहे.

(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

## सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागातील रिक्त पदे भरण्याबाबत

**(१२) २४६२७ (१६-१२-२०१६). ॲड.जयदेव गायकवाड, श्री.अनिल भोसले, श्री.किरण पावसकर, श्रीमती विद्या चव्हाण :** सन्माननीय **सामाजिक न्याय मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग आणि आयुक्त कार्यालयात १ हजार ७४७ पदे रिक्त आहेत, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, कोणकोणत्या संवर्गाची व केंव्हापासून सदर पदे रिक्त आहेत,

(३) असल्यास, सदर प्रकरणी शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.राजकुमार बडोले (०५-०१-२०१८) :** (१) होय, समाजकल्याण आयुक्तालयाच्या आस्थापनेवरील सरळसेवेच्या कोट्यातील गट अ ते गट ड संवर्गात एकूण २६२७ पदे रिक्त आहेत.

(२) समाजकल्याण आयुक्तालयाच्या आस्थापनेवरील सरळसेवेच्या कोट्यातील गट अ संवर्गात ८३, गट ब संवर्गात ४४, गट क संवर्गात १२०४ आणि गट ड संवर्गात १२९६ अशी एकूण २६२७ पदे रिक्त आहेत.

(३) शासन निर्णय दिनांक २ जून, २०१५ व शासन निर्णय दिनांक १५ जानेवारी, २०१६ नुसार शासनाने सरळसेवा भरतीस निर्बंध घातले आहेत. तथापि, प्रधान सचिव (सेवा) यांच्या अध्यक्षतेखाली गठीत केलेल्या समितीने मान्यता दिल्यानुसार समाजकल्याण आयुक्तालयाच्या आस्थापनेवरील सरळसेवेच्या कोट्यातील “समाजकल्याण निरीक्षका”च्या १२ रिक्त पदांपैकी ९ पदे तसेच “वरिष्ठ लिपीकां”च्या ९६ रिक्त पदांपैकी ३० पदे विशेष बाब म्हणून भरण्याची कार्यवाही सुरु आहे.

(५) प्रश्न उद्‌भवत नाही.

**यवतमाळ जिल्ह्यातील बेंबळा प्रकल्पग्रस्तांना नागरी सुविधा देण्याबाबत**

**(१३) २५०७० (३०-१२-२०१६). श्री.ख्वाजा बेग, श्री.आनंद ठाकूर : तारांकित प्रश्न क्रमांक २१९३१ ला दिनांक १९ जुलै, २०१६ रोजी दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **मदत व पुनर्वसन मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) यवतमाळ जिल्ह्यातील बेंबळा प्रकल्पात ज्या शेतकऱ्यांच्या जमिनी तसेच घरे गेली त्या शेतकऱ्यांच्या पुनर्वसित गावात नागरी सुविधा दिल्या नाहीत, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, सदर पुनर्वसित गावांत नागरी सुविधा देण्याबाबत शेतकऱ्यांनी व लोकप्रतिनिधींनी शासनाकडे मागणी करूनही कोणतीच कार्यवाही करण्यात आली नाही, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले व तद्नुसार प्रकल्पग्रस्तांना नागरी सुविधा देण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.चंद्रकांत पाटील (२८-१२-२०१७) :** (१), (२), (३) व (४) बेंबळा प्रकल्पामुळे बाधित असलेल्या १६ गावांचे पुनर्वसन २० ठिकाणी करुन पुनर्वसित गावठाणाकरिता १८ नागरी सुविधा सन २००७ पूर्वी पूर्ण करण्यात आल्या आहेत. याशिवाय शेतकऱ्यांच्या व लोकप्रतिनिधींच्या मागणीनुसार प्रकल्पग्रस्तांना समाजमंदिर, पुरक पाणीपुरवठा योजनेचे बांधकाम इ. अतिरिक्त नागरी सुविधा पुरविण्यात आलेल्या आहेत.

---

**कमाल नागरी जमीन धारणा कायदा (युएलसी) रद्द झाल्यानंतर अतिरिक्त ठरलेल्या जमिनींचा गैरवापर होत असल्याबाबत**

**(१४) २६७७९ (१३-०४-२०१७). श्री.सतेज ऊर्फ बंटी पाटील, श्री.संजय दत्त, श्री.आनंदराव पाटील, श्री.धनंजय मुंडे, श्री.अमरसिंह पंडित, ॲड.निरंजन डावखरे, श्री.सुभाष झांबड :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) कमाल नागरी जमीन धारणा कायदा (युएलसी) रद्द झाल्यानंतर अतिरिक्त ठरलेल्या जमिनी महाराष्ट्र गृहनिर्माण मंडळ आणि संबंधित महानगरपालिकांना हस्तांतरित करण्यात आल्याचा दावा प्रधान सचिव, नगरविकास विभाग यांनी केला असल्याचे माहे डिसेंबर, २०१६ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उपरोक्त केलेला दावा खोटा असून या जमिनी खरोखरच म्हाडा आणि महानगरपालिकांना हस्तांतरीत करण्यात आल्या असल्यास त्याची संपूर्ण माहिती नगरविकास विभागाकडे सध्य:स्थितीत उपलब्ध नसून मोठमोठया विकासकांना फायदा देण्यासाठी यूएलसी जमिनींचा गैरवापर करण्यात आला आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करून कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (३०-०१-२०१८) :** (१) व (२) नागरी जमीन (कमाल धारणा व विनियमन) अधिनियम, १९७६ मधील तरतूदीनुसार शासनाकडे निहित झालेल्या जमिनी शासन निर्णय दिनांक ०४/०५/२०१६ अन्वये गृहनिर्माण प्रकल्प राबविण्यासाठी महाराष्ट्र क्षेत्र विकास प्राधिकरणाला हस्तांतरीत करण्यात आल्या आहेत.

शासन निर्णय दिनांक ०४/०५/२०१६ अन्वये म्हाडाला हस्तांतरीत करावयाच्या जमिनी ह्या राज्यातील ९ नागरी समुहांच्या जिल्हाधिकारी तथा सक्षम प्राधिकारी यांच्या स्तरावरुन हस्तांतरीत होणार आहेत. परिणामी अशा जमिनीचा गैरवापर होण्याचा प्रश्न उद्‌भवत नाही.

(३) प्रश्न उद्‌भवत नाही.

(४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## ठाणे महानगरपालिकेने निसमर्थ व दिव्यांगांच्या योजनांकरिता अल्प प्रमाणात खर्च केल्याबाबत

**(१५) २७७४० (१३-०४-२०१७). ॲड.निरंजन डावखरे :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) निसमर्थ व दिव्यांगाच्या कल्याणकारी योजनांसाठी ठाणे महानगरपालिकेच्या समाजकल्याण विभागामार्फत सन २०११-१२ ते सन २०१५-१६ या वर्षात रुपये २३ कोटी ७२ लाख इतक्या रकमेची वर्षनिहाय आर्थिक तरतूद करण्यात आली असतानाही मागील ५ वर्षात केवळ १ कोटी ५५ लाख म्हणजे १ टक्क्याहूनही कमी रक्कम प्रत्यक्षात खर्च झाली असल्याचे दिनांक ९ जानेवारी, २०१७ रोजी वा त्यासुमारास निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, शासनाने प्रथम सन २०१४ मध्ये अध्यादेश प्रख्यापित करुन दिव्यांगाचा सर्व्हे करण्याचा आदेश ठाणे महानगरपालिकेला दिला होता तसेच त्यानंतर सन २०१५ मध्ये सदर अध्यादेशासंदर्भात महापालिकेस पुन्हा स्मरणपत्र देखील पाठविले होते, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, महापालिकेने याबाबत योजनेचा प्रचार व प्रसार जनतेमध्ये केल्या नसल्याच्या तक्रारी बृहन्महाराष्ट्र दिव्यांग विकास कामगार संघटनेच्या पदाधिकाऱ्यांनी शासनाकडे माहे जानेवारी, २०१७ मध्ये केल्या आहेत, हे ही खरे आहे काय,

(४) असल्यास, या योजनेसाठी भरीव आर्थिक तरतुद करुनही निसमर्थ व दिव्यांगांच्या योजनांवर गत पाच वर्षात कमी खर्च होण्याबाबत चौकशी करण्यात आली आहे काय, चौकशीचे निष्कर्ष काय आहेत व त्यानुषंगाने शासनाने काय कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (२९-०१-२०१८) :** (१) सन २०११-१२ पासून ते सन २०१५-१६ या आर्थिक वर्षामध्ये एकूण रुपये २३ कोटी ७२ लक्ष इतकी तरतूद करण्यात आली होती. त्यामधून रुपये १ कोटी ५५ लक्ष इतकी रक्कम खर्च करण्यात आली आहे.

सदर रक्कम खर्च करीत असताना विविध माध्यमाद्वारे योजनांना प्रसिध्दी देण्यात येऊन अर्ज विनामूल्य वितरीत करून जे लाभार्थी पात्र होते अशा सर्व ७५८ लाभार्थ्यांना लाभ देण्यात आला आहे.

(२) दिव्यांग बांधवांची नोंदणी करण्यासाठी सर्व महानगरपालिका / नगरपालिका यांना दिनांक ०४/१०/२०१३ च्या परिपत्रकान्वये सूचना देण्यात आल्या असून दिनांक २०/०८/२०१५ च्या परिपत्रकान्वये सदर सूचनांची काटेकोरपणे अंमलबजावणी करण्याचे सर्व संबंधितांना कळविण्यात आले आहे.

(३) होय.

(४) या प्रकरणी निधी अखर्चित राहिल्याचे प्रथम दर्शनी निदर्शनास येत असल्याने संबंधितांनी कर्तव्यकसूर केला आहे का? याबाबत चौकशी करुन सबंधितावर शिस्तभंगाची कारवाई करावी अशा सूचना आयुक्त, ठाणे महानगरपालिका यांना देण्यात आल्या आहेत.

(५) प्रश्न उद्भवत नाही.

---

**राज्यात अनुकंपा तत्वावर असलेल्या शिक्षक व शिक्षकेतर कर्मचाऱ्यांच्या पदांमधील त्रुटी दूर करण्याबाबत**

**(१६) २८२२१ (१२-०४-२०१७). आर्कि.अनंत गाडगीळ** : सन्माननीय **शालेय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यात अनुकंपा तत्वावर असलेल्या शिक्षक व शिक्षकेतर कर्मचाऱ्यांच्या पदांमधील त्रुटी दूर करण्यासाठी शासन प्रयत्न करणार असुन याकरिता उपसंचालकांना विशेष अधिकार देण्यात येणार असल्याचे माहे डिसेंबर, २०१६ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे काय,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.विनोद तावडे (३१-०१-२०१८)** : (१) अशी बाब शासनाच्या निदर्शनास आलेली नाही.

(२) व (३) प्रश्न उद्भवत नाही.

---

**नागरिकांकडून होत असलेल्या सर्वप्रकारच्या तक्रारींना आळा घालण्याबाबत**

**(१७) २९१४५ (१३-०४-२०१७). श्रीमती हुस्नबानू खलिफे :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) शासनाच्या अधिपत्याखालील प्राधिकरणांमध्ये कामासाठी बराच वेळ थांबावे लागणे, कर्मचारी दखल न घेणे, योग्य प्रकारे उत्तरे न देणे, अधिकारी जागेवर नसणे, अनेक वेळा फेऱ्या मारावे लागणे किंवा काम करुन घेण्यासाठी पैसे द्यावे लागत असल्याच्या तक्रारी नागरिकांकडून होत असल्याने या सर्वप्रकारच्या तक्रारींना आळा घालण्यासाठी उपाययोजना करण्याबाबत राज्य शासन विचाराधीन असल्याचे माहे डिसेंबर, २०१६ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उक्त प्रकरणी शासकीय कामासाठी आलेल्या नागरिकांना निर्भीडपणे आपला अभिप्राय नोंदवून, आपले अनुभव स्पष्टपणे शासनापर्यंत पोहोचविले तर संबंधित कर्मचारी वा अधिकारी यांच्या गोपनीय अहवालात त्याचे योग्य ते मूल्यमापन करुन दोषी कर्मचाऱ्यास आपल्या वर्तणुकीचे परिणाम भोगावे लागतील असा निर्णय शासनाने घेतला आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, यासाठी कोणत्या प्रकारची यंत्रणा शासनाने उभारली आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (१५-०१-२०१८) :** (१) शासकीय कार्यालयांमध्ये प्राप्त झालेल्या निवेदनांवर बारा आठवड्यामध्ये कार्यवाही करण्याबाबत, शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक : संकीर्ण २०१३ / प्र. क्र. ८/१८ (र. व का.), दिनांक १८ जानेवारी, २०१३ अन्वये सूचना निर्गमित करण्यात आलेल्या आहेत. तसेच ऑनलाईन तक्रारींसंदर्भात 'आपले सरकार' - तक्रार निवारण प्रणालीसाठी शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक : संकीर्ण २०१६ / प्र. क्र. १३० / १८ (र. व का.), दिनांक २४ ऑगस्ट, २०१६ अन्वये कार्यपद्धती विहित करण्यात आली आहे.

(२) व (३) शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक : संकीर्ण २०१६ / प्र. क्र.(२०४/१६) / सहा, दिनांक २३ नोव्हेंबर, २०१६ अन्वये प्रत्येक सार्वजनिक प्राधिकरणाकडे अभ्यागतांना अभिप्रायासाठी फॉर्म ठेवण्याबाबत व त्यानुसार संबंधित अधिकाऱ्याच्या जनतेबरोबरच्या वागणुकीच्या अनुषंगाने त्याच्या गोपनीय अहवालात मुल्यमापन करण्याबाबत निदेश देण्यात आले आहेत.

(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## पाचोरा (जि.जळगांव) तालुक्यातील रिक्षा पासिंग तालुकास्तरावर कॅम्पच्या दिवशी होणेबाबत

**(१८) २९६०२ (१५-०४-२०१७). श्रीमती स्मिता वाघ :** सन्माननीय **परिवहन मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) पाचोरा (जि.जळगांव) तालुक्यातील रिक्षा पासिंग कॅम्प तालुकास्तरावरील कॅम्पच्या दिवशी होण्याबाबत तसेच, परिवहन विभागातर्फे आकारण्यात येणारा दंड रूपये ५० रद्द करणेबाबत एकता ऑटो रिक्षा चालक-मालक युनियन, जळगांव यांनी लेखी निवेदनाद्वारे मा.परिवहन मंत्री यांना दिनांक १९ जानेवारी, २०१७ रोजी वा त्यासुमारास विनंती केली आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करून कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.दिवाकर रावते (२९-०१-२०१८) :** (१) हे खरे आहे.

(२) सदरची शुल्कवाढ केंद्र शासनाव्दारे करण्यात आलेली आहे.

मा.उच्च न्यायालयाच्या आदेशाप्रमाणे व केंद्रीय मोटार वाहन नियमानुसार परिवहन संवर्गातील वाहनांना योग्यता प्रमाणपत्र जारी करतांना ब्रेक टेस्टसाठी टेस्टींग ट्रॅकची आवश्यकता असून टेस्टींग ट्रॅक कॅम्पच्या ठिकाणी उपलब्ध नसल्याने परिवहन वाहनांची योग्यता प्रमाणपत्राची चाचणी कॅम्पच्या ठिकाणी घेता येत नाही.

(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

## शिवणगांव (जि.नागपूर) प्रकल्पबाधितांना प्रकल्पग्रस्तांच्या यादीतून वगळण्यात आल्याबाबत

**(१९) ३०१६८ (१५-०४-२०१७). श्री.परिणय फुके :** सन्माननीय **मदत व पुनर्वसन मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) शिवणगांव (जि.नागपूर) प्रकल्पग्रस्तांच्या पुनर्वसनाकरिता देण्यात आलेल्या

प्लॉटमध्ये जिल्हाधिकारी, नागपूर यांनी जारी केलेल्या अंतिम यादीत अनेक प्रकल्पग्रस्तांची नावे वगळण्यात आल्याचे दिनांक ७ जानेवारी, २०१७ रोजी वा त्यासुमारास निदर्शनास आले, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीच्या अनुषंगाने प्रकल्पबाधित यादीतून वगळण्यात आलेल्या प्रकल्पग्रस्तांना प्लॉट वितरीत करण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.चंद्रकांत पाटील (२८-१२-२०१७) :** (१) हे खरे नाही.
(२) मौजा शिवणगांव येथील १०८८ प्रकल्पग्रस्तांना भूखंड देण्याकरिता अंतिम तयार करण्यात आली होती. यापैकी ९७९ प्रकल्पग्रस्तांना दिनांक २६/२/२०१६ ते १८/१/२०१७ दरम्यान भूखंड वाटप ईश्वर चिठ्ठीद्वारे करण्यात आलेले आहे. उर्वरित १०९ प्रकल्पग्रस्तांना भूखंड वाटप तात्पुरते प्रलंबित ठेवण्यात आलेले आहे.

प्रलंबित ठेवण्यात आलेल्या भूखंडाबाबत महाराष्ट्र विमानतळ विकास कंपनी यांचेकडून कळविण्यात आले असून त्यांचेकडून अहवाल प्राप्त होतास प्रलंबित भूखंडाचे वाटपाबाबत कार्यवाही करण्यात येईल.
(३) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

**मुखेड (जि.नांदेड) तालुक्यातील तालुका कृषी अधिकारी कार्यालयातील बेजबाबदार अधिकारी व कर्मचारी यांच्यावर कारवाई करण्याबाबत**

**(२०) ३०४३२ (१५-०४-२०१७). श्री.अमरनाथ राजूरकर :** सन्माननीय **कृषी मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) मुखेड (जि.नांदेड) तालुक्यातील तालुका कृषी अधिकारी कार्यालय हे ग्रामीण भागातील शेतकऱ्यांसाठी शेतीविषयक माहिती व शासनाच्या विविध शेतीविषयक योजनेची माहिती होण्यासाठी मुख्य कार्यालय असून सदर कार्यालयात शेतकरी शेतीविषयक माहिती विचारण्यासाठी आले असता सदरील कार्यालयातील अधिकारी व कर्मचारी कार्यालयात उपस्थित नसल्याचे माहे जानेवारी, २०१७

मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले, हे खरे आहे काय,
(२) असल्यास उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले व तद्नुसार संबंधित बेजबाबदार अधिकारी व कर्मचाऱ्यांवर कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.पांडुरंग फुंडकर (२९-०१-२०१८) :** (१) हे खरे नाही.

मुखेड तालुक्यातील तालुका कृषी अधिकारी कार्यालयातील अधिकारी / कर्मचाऱ्यांवर नियंत्रण ठेवण्यासाठी व वेळेवर हजर राहणाऱ्यासाठी उपस्थिती नोंदवही सहायक अधिक्षकाचे नियंत्रणाखाली ठेवण्यात आली आहे.

अधिकची उपाययोजना म्हणून कार्यालयात Biometric हजेरीपत्रक बसविण्यात आले आहे.
(२) प्रश्न उद्भवत नाही.
(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

**वसई-विरार महानगरपालिका क्षेत्रात सिडको ने दिलेल्या सुधारित बांधकाम परवानगीपेक्षा विकासकाने अतिरिक्त बांधकाम केल्याबाबत**

**(२१) ३१०१९ (११-०८-२०१७). श्री.रविंद्र फाटक :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) वसई-विरार महानगरपालिका हद्दीतील सर्वे क्र. ६१, ६२ व मौजे निळेमोरे सर्वे क्र. ३४ मध्ये विकासकाने तत्कालीन नियोजन प्राधिकरण सिडको यांनी सुधारित बांधकाम परवानगी माहे फेब्रुवारी, २००६ व दिनांक १८ फेब्रुवारी, २०१० रोजी वा त्यासुमारास दिलेल्या परवानगीपेक्षा अतिरिक्त बांधकाम केल्याचे निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, उक्त सर्वे क्र. ६२ हिस्सा १० आणि सर्वे क्र. हिस्सा १० व ११, सर्वे क्र. ६२ चा क्र.३ व सर्वे क्र. ६३ हिस्सा क्र. १३ व १४ मध्ये अनधिकृत बांधकाम झाल्याबाबतचे संबंधित व्यक्तीने महानगरपालिकेस दिनांक २८ फेब्रुवारी, २०१७ रोजी निवेदन दिले आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने विकासकावर कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (२२-०१-२०१८) :** (१) व (२) होय, हे खरे आहे.

अनधिकृत बांधकाम झाल्याबाबत वसई-विरार शहर महानगरपालिकेस निवेदन प्राप्त झाले आहे.
(३) वसई-विरार शहर महानगरपालिका हद्दीतील मौजे विरार सर्वे नं. ६१, ६२ व ६३ या जागेवर अनधिकृत बांधकामधारक व बनावट परवानगी तयार करणारे संबंधित विकासक यांचेवर भारतीय दंड संहिता १८६० अन्वये ४२०, ४६५, ४६८, ४७१ व महाराष्ट्र प्रादेशिक नगर रचना अधिनियमातील कलम ५१, ५२, ५३ अंतर्गत FIR क्र.I ४०७/२०१७ अन्वये गुन्हा दाखल केला आहे.

सद्य:स्थितीत इमारतीमध्ये रहिवास असल्याचे तसेच वसई-विरार शहर महानगरपालिका हद्दीतील मौजे निळेमोरे सर्वे नं. ३४ या जागेवरील अनधिकृत बांधकाम विकासक श्री.पराग आर लधानी व इतर यांना दिनांक ०५.०४.२०१७ रोजी महाराष्ट्र प्रादेशिक नगर रचना अधिनियमा अंतर्गत नोटीस देण्यात आली असल्याचे तसेच भारतीय दंड संहिता, कलम ४२०, ४६५, ४६८, ४७१ व ३४ अंतर्गत दिनांक ०१/०६/२०१७ रोजी फौजदारी गुन्हा दाखल करण्यात आला असल्याचे वसई-विरार शहर महानगरपालिकेने कळविले आहे.
(४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## अंतवडी व औंड (ता.कराड, जि.सातारा) येथे कृषी विभागाच्यावतीने बांधण्यात आलेल्या सिमेंट बंधाऱ्यांची कामे निकृष्ट दर्जाची झाल्याबाबत

**(२२) ३११०७ (१८-०८-२०१७). श्री.आनंदराव पाटील :** सन्माननीय **पाणीपुरवठा व स्वच्छता मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) कराड (जि.सातारा) पंचायत समितीच्या मासिक सभेत औंड येथील पाणीपुरवठा योजनेच्या पाईपलाईनच्या दर्जावर सदस्यांनी तीव्र नाराजी व्यक्त केल्याचे माहे मे, २०१७ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, अंतवडी व औंड (ता.कराड, जि.सातारा) येथे कृषी विभागाच्यावतीने बांधण्यात आलेल्या सिमेंट बंधाऱ्यांची कामे निकृष्ट झाली आहेत, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन निकृष्ट दर्जाची कामे करणाऱ्यांवर कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.बबनराव लोणीकर (१२-०१-२०१८) :** (१) होय, हे खरे आहे.

(२) हे खरे नाही.

मौजे अंतवडी व औंड या गावात सन २०१६-१७ मध्ये अनुसूचित जाती उपाययोजनांतर्गत (विशेष घटक योजनेंतर्गत) प्रत्येकी चार याप्रमाणे आठ सिमेंट बंधाऱ्यांची कामे झालेली आहेत. सदर कामांमुळे पावसाळ्यात चांगला पाणीसाठा होवून त्याचा फायदा आजूबाजूच शेतकऱ्यांच्या विहिरींना पाणीपुरवठा झाल्यामुळे पाण्याची पातळी वाढून पिकांना फायदा झालेला आहे. सदरची कामे दर्जेदार झालेली आहेत.

औंड पंचायत समिती सदस्य, सरपंच, ग्रामस्थ व अंतवडी गावचे सरपंच, ग्रामस्थ यांनी झालेल्या बंधाऱ्यांच्या कामाला भेटी देवून समाधान व्यक्त केलेले आहे. झालेल्या बंधाऱ्यांच्या कामांबाबत कोणत्याही प्रकारची तक्रार प्राप्त झालेली नाही.

(३) औंड येथील नळ पाणीपुरवठा योजनेचे काम करणाऱ्या ठेकेदाराने ग्रामीण पाणीपुरवठा विभाग, जिल्हा परिषद सातारा कार्यालयास काहीही कल्पना न देता परस्पर बहुतांश काम केले. काम पूर्ण करुन पाणीपुरवठा चालू केला असून सद्य:स्थितीत पाणीपुरवठा सुरु आहे. परंतु या कामासाठी वापरण्यात आलेले पाईप्स शासनमान्य कंपनीचे नसल्याने हे काम स्विकारण्यात आले नाही. तसेच केलेल्या कामाचे देयकही संबंधित ठेकेदारास अदा करण्यात आलेले नाही. सं◌ंबंधित ठेकेदारास दंडात्मक कारवाई करण्याबाबतची नोटीस देण्यात आली असता सदरचे काम स्वखर्चाने फेर करुन देण्याबाबत संबंधित ठेकेदाराने लेखी कळविले आहे. त्यानुसार बहुतांश कामे पुर्ण केली असून उर्वरित कामे दहा ते बारा दिवसांत पुर्ण होणे अपेक्षित आहे.

(४) सदर नळ पाणीपुरवठा योजनेचे काम पुर्ण करण्याची मुदत दिनांक २८/०३/२०१८ पर्यंत असल्याने विलंब झालेला नाही.

---

## ज्येष्ठ नागरिकांची वयोमर्यादा ६५ ऐवजी ६० वर्षे करण्याबाबत

**(२३) ३१४२८ (१८-०८-२०१७). ॲड.निरंजन डावखरे, श्री.दत्तात्रय सावंत, श्री.श्रीकांत देशपांडे, डॉ.सुधीर तांबे, श्री.जगन्नाथ शिंदे, श्री.गोपिकिशन बाजोरीया, श्री.शरद रणपिसे, श्री.संजय दत्त, श्री.अशोक ऊर्फ भाई जगताप, श्री.रामहरी रुपनवर, श्री.आनंदराव पाटील, श्रीमती हुस्नबानू खलिफे, श्री.सुभाष झांबड, श्री.नरेंद्र पाटील, श्री.हेमंत टकले : तारांकित प्रश्न क्रमांक २७३८४ ला दिनांक २१ मार्च, २०१७ रोजी दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **सामाजिक न्याय मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यातील वृध्द नागरिकांना शासनामार्फत दरमहा रक्कम रुपये ६००/- इतके अनुदान देण्यात येत असून सुमारे २५ लाख वृध्द नागरिकांना याचा लाभ मिळत आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, जेष्ठ नागरिकास दिल्या जाणाऱ्या प्रवास व अन्य सामाजिक सेवा सवलतींसाठी केंद्रात ६० वर्षे व राज्यात ६५ वर्षे पूर्ण असणे आवश्यक आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, राज्यात देखील केंद्राप्रमाणे ज्येष्ठ नागरिकांची वयोमर्यादा ६५ वर्षाऐवजी ६० वर्षे निर्धारित करण्यात यावी अशी मागणी अनेक वर्षांपासून करण्यात येत आहे, हे ही खरे आहे काय,

(४) असल्यास, उपरोक्त विचाराधीन असलेल्या प्रस्तावावर शासनाने कोणता निर्णय घेतला वा घेण्यात येत आहे व त्याचे सर्वसाधारण स्वरुप काय आहे,

(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.राजकुमार बडोले (०६-०१-२०१८) :** (१) होय.

(२) होय.

(३) व (४) राज्यात केंद्राप्रमाणे जेष्ठ नागरिकांची वयोमर्यादा ६५ ऐवजी ६० वर्षे करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन आहे.

(५) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## राज्यातील विनाअनुदानित कला, विज्ञान व वाणिज्य महाविद्यालयांची नॅकद्वारे तपासणी करण्याबाबत

**(२४) ३१४७८ (११-०८-२०१७). डॉ.अपूर्व हिरे, प्रा.अनिल सोले :** सन्माननीय **उच्च व तंत्र शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यातील विनाअनुदानित तत्वावरील कला, विज्ञान व वाणिज्य महाविद्यालयांनी नॅक कमिटी/समितीमार्फत मूल्यांकन केले नसल्याने बहुतांश ठिकाणी विनाअनुदानित महाविद्यालयांकडून उच्च शिक्षणासाठीच्या आवश्यक भौतिक व शैक्षणिक निकषांची पूर्तता केली जात नसल्याचे निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, नॅक समितीमार्फत मुल्यांकन न केलेल्या विनाअनुदानित महाविद्यालयांकडून विद्यार्थ्यांना चुकीचे, निकृष्ट दर्जाचे शिक्षण दिले जात असल्याने विद्यार्थ्यांचे होत असलेले शैक्षणिक नुकसान विचारात घेता, अनुदानित महाविद्यालयाच्या धर्तीवर विनाअनुदानित कला, विज्ञान व वाणिज्य महाविद्यालयांना नॅक कमिटीमार्फत मुल्यांकनाची सक्ती करण्याबाबत तसेच अशा विनाअनुदानित महाविद्यालयांची मान्यता काढून घेण्याबाबत शासनाचे धोरण काय आहे,

(३) नसल्यास, विनाअनुदानित कला, विज्ञान व वाणिज्य महाविद्यालयांची शैक्षणिक गुणवत्ता व भौतिक तसेच शैक्षणिक सोयी सुविधांची नॅकद्वारे तपासणी करण्याबाबत शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे?

**श्री.विनोद तावडे (२४-०१-२०१८) :** (१) अंशत: खरे आहे.

(२) शासन निर्णय दिनांक ०८/१०/२०१० अन्वये सर्व अकृषी विद्यापीठांतर्गत संलग्नित पात्र महाविद्यालयांनी मुल्यांकन व पुनर्मुल्यांकन करण्याबाबतचे निर्देश देण्यात आलेले आहे. तसेच, महाराष्ट्र सार्वजनिक विद्यापीठ अधिनियम २०१६ मधील कलम १०९(६)(क) नुसार महाविद्यालयांसाठी मुल्यांकन व पुनर्मुल्यांकन अनिवार्य करण्यात आलेले आहे.

(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

## मुंबईतील प्रलंबित विकासकामांबाबत

**(२५) ३१५९० (११-०८-२०१७). श्री.विजय ऊर्फ भाई गिरकर :** सन्माननीय **महसूल मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) मुंबई महानगरपालिकेने रुपये ५४० कोटी देऊनही जिल्हाधिकारी कार्यालयाकडून भूसंपादन करण्याचे सुमारे १६६ प्रस्तावांवर कोणताही निर्णय घेण्यात आला नसल्याचे निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उक्त बाबीमुळे शाळा, मनोरंजन मैदाने, डी पी रोड, मार्केट, पार्किंग इत्यादी महत्वाची विकासकामे प्रलंबित असल्याचे निदर्शनास आले आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, या जमिनीपैकी सर्वाधिक भूसंपादनाचे प्रस्ताव अंधेरी (पश्चिम) येथील के पश्चिम विभागाकडे प्रलंबित असल्याचे निदर्शनास आले आहे, हे ही खरे आहे काय,

(४) असल्यास, महत्वाच्या विकासकामांना चालना देण्यासाठी उक्त प्रलंबित असलेली भूसंपादनाची प्रकरणे निकाली काढण्यासाठी शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.चंद्रकांत पाटील (११-०१-२०१८) :** (१) व (२) अंशत: खरे आहे.

जिल्हाधिकारी, मुंबई उपनगर यांच्या कार्यालयाशी १२३ तर जिल्हाधिकारी, मुंबई शहर यांच्या कार्यालयाशी ४४ प्रस्ताव असे एकूण १६७ प्रस्ताव संबंधित आहेत.

अ) जिल्हाधिकारी, मुंबई शहर यांचेकडील एकूण ४४ प्रस्तावांपैकी १३ प्रस्तावांवर कार्यवाही सुरु आहे.

उर्वरित ३१ प्रस्तावांची विगतवारी खालीलप्रमाणे :-

१) बृहन्मुंबई महानगरपालिकेकडून अप्राप्त - ९

२) बृहन्मुंबई महानगरपालिकेकडे परत पाठविण्यात आलेले - १७

३) कार्यवाही पूर्ण तथापि न्यायालयात प्रलंबित - ३

४) निवाडा घोषित परंतु बृहन्मुंबई महानगरपालिकेने ताबा न घेतलेले - २

ब) जिल्हाधिकारी, मुंबई उपनगर यांचेकडील एकूण १२३ प्रस्तावांपैकी ५४

प्रस्तावांवर कार्यवाही सुरु आहे.

उर्वरित ६९ प्रस्तावांची विगतवारी खालीलप्रमाणे :-

१) बृहन्मुंबई महानगरपालिकेकडे परत पाठविण्यात आलेले प्रस्ताव-५६

२) आरक्षण रद्द परंतु प्रस्ताव अप्राप्त - १

३) निवाडा घोषित करुन ताबा देणेसाठी - ६

४) कार्यालयास अपाप्त - ३

५) कार्यवाही पूर्ण तथापि न्यायालयात प्रलंबित - २

६) यादित दुबार असलेली प्रकरणे - १

तसेच बृहन्मुंबई महानगरपालिकेच्या प्रस्तावांसाठी जिल्हाधिकारी, मुंबई उपनगर यांचेकडे सुमारे रुपये २९४.७० कोटी इतका निधी जमा आहे. (प्रलंबित प्रकरणांसाठी सुमारे रुपये २४७.४५ कोटी व महानगरपालिकेकडे परत केलेल्या प्रकरणांसाठी सुमारे ४७.२५ कोटी) आणि जिल्हाधिकारी, मुंबई शहर यांचेकडे सुमारे रुपये ५७.५३ कोटी इतका निधी जमा आहे. (प्रलंबित प्रकरणांसाठी सुमारे रुपये ४६.५० कोटी व महानगरपालिकेकडे परत केलेल्या प्रकरणांसाठी सुमारे ११.०३ कोटी) अशी एकूण सुमारे रुपये ३५२.२३ कोटी निधी रक्कम जमा आहे.

(३) अंधेरी के / पश्चिम विभागात एकूण २१ भूसंपादनाचे प्रस्तावांपैकी ५ प्रकरणांमध्ये भूखंडाची मालकी म्हाडाकडे असल्याने सदर प्रस्ताव मुंबई महानगरपालिकेने परत घेतले आहेत.

उर्वरित १६ भूसंपादन प्रस्तावांची विगतवारी खालीलप्रमाणे :-

१) भूसंपादन पूर्ण ; बृहन्मुंबई महानगरपालिकेच्या ताब्यात - १

२) शासनकडून स्थगिती - १

३) मा.न्यायालयाने आरक्षण विरहीत घोषित केलेले - १

४) वेगवेगळ्या स्तरावर प्रलंबित -१३

(४) मुंबईतील महत्वाच्या विकास कामांना चालना देण्यासाठी रखडलेली भूसंपादनाची प्रकरणे तातडीने निकाली काढण्यासाठी शासनस्तरावरुन संबंधित जिल्हाधिकारी यांना शासन पत्र क्र.विसताप्र-०७/२०१७/प्र.क्र.१०७/अ-२, दिनांक ०८/०८/२०१७ अन्वये आवश्यक सूचना देण्यात आलेल्या आहेत.

जिल्हाधिकारी, मुंबई शहर यांचे अध्यक्षतेखाली दिनांक ०९/१०/२०१७ रोजी झालेल्या बैठकीत विषयांकीत प्रलंबित प्रकरणांचा आढावा घेऊन आवश्यक

कार्यवाही तातडीने करणेबाबत संबंधित अधिकाऱ्यांना सूचना देण्यात आलेल्या आहेत. तसेच जिल्हाधिकारी, मुंबई उपनगर यांच्या दिनांक २४/११/२०१७ रोजीच्या पत्रानुसार प्रलंबित प्रकरणांमध्ये संबंधित यंत्रणांशी समन्वय साधून भूसंपादनाची प्रक्रिया जलद गतीने करणेची कार्यवाही सुरु आहे.
(५) प्रश्न उद्भवत नाही.

---

**राज्य सहकारी बँकेच्या माध्यमातून कार्यकारी सेवा संस्थांना**
**कर्ज पुरवठा करण्याबाबत**

**(२६) ३१९७५ (१८-०८-२०१७). डॉ.अपूर्व हिरे, श्री.नागोराव गाणार, प्रा.अनिल सोले : तारांकित प्रश्न क्रमांक २७४२२ ला दिनांक ७ मार्च, २०१७ रोजी दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **सहकार मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) राज्य सहकारी बँकेच्या माध्यमातून विविध कार्यकारी सेवा संस्थांना थेट कर्ज पुरवठा करण्याच्या विचाराधीन बाबींवरील शासनाचा विचार पुर्ण झाला आहे काय,
(२) असल्यास, याबाबत शासनाने कोणता निर्णय घेतला आहे, त्याचे स्वरुप काय आहे तसेच या निर्णयाची अंमलबजावणी केव्हापासून होणे अपेक्षित आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.सुभाष देशमुख (०३-०१-२०१८) :** (१), (२) व (३) याबाबत राज्य शासनाच्या सहकार विभागाकडून कोणतेही निश्चित धोरण जाहीर केलेले नाही किंवा त्याबाबतचे आदेश निर्गमित केलेले नाहीत. तथापि, महाराष्ट्र राज्य सहकारी बँकेतर्फे दिनांक ०३/११/२०१६ रोजी जिल्हा बँकांच्या राज्यस्तरीय परिषदेमध्ये केलेल्या सूचनेच्या अनुषंगाने महाराष्ट्र राज्य सहकारी बँकेच्यास्तरावर बँकेच्या दिनांक ३१/०७/२०१७ च्या प्रशासकीय मंडळ - कार्यकारी समितीच्या सभेत अर्थक्षम विविध कार्यकारी सेवा सहकारी संस्थांना राज्य बँकेमार्फत थेट कर्ज पुरवठा करण्याबाबतचे धोरण संमत केले आहे.

---

## पुणे शहरातील पीएमपीच्या भरती प्रक्रियेत परिक्षार्थीदृष्टीहिन उमेदवारावर अन्याय केल्याबाबत

**(२७) ३२३५७ (११-०८-२०१७). श्री.अनिल भोसले :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) पुणे शहरातील पीएमपीमध्ये अनेक पदांच्या भरतीसाठी घेण्यात येणाऱ्या परिक्षेत क्लिनर पदासाठी ७५ टक्के अंध असलेल्या मधुकर आकाश कुदळे या उमेदवाराने परिक्षेसाठी सहाय्यक मिळावा अशी विनंती करुनही पीएमपी प्रशासनातील वरिष्ठ अधिकाऱ्यांनी या उमेदवाराला परिक्षेत बसू न दिल्याची घटना माहे एप्रिल, २०१७ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आली आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, त्यात काय आढळून आले व तद्नुसार दृष्टीहीन उमेदवारास त्याच्या हक्कांपासून वंचित ठेवणाऱ्या व त्यांच्याशी असभ्य वर्तन करणाऱ्या वरिष्ठ अधिकाऱ्यांवर कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (२५-०१-२०१८) :** (१) व (२) श्री.मधुकर आकाश कुदळे या उमेदवाराने बदली क्लिनर पदासाठी ऑनलाईन अर्ज भरलेला होता. सदर उमेदवाराने ऑनलाईन अर्ज भरताना शारिरिक अपंगत्व आहे, असे नमुद केले होते.

पुणे महानगर परिवहन महामंडळ लि. यांच्या अहवालामध्ये श्री.मधुकर आकाश कुदळे या अपंग उमेदवाराने जाहिरातीतील सुचना क्र.३.४ च्या अनुषंगाने १५ दिवसांच्या आत (मुदतीत) लेखनिक/सहाय्यक मिळणेबाबत अर्ज महामंडळाकडे केला असल्याचे दिसून आले नाही असे स्पष्ट केले आहे.

(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

## भिवंडी-कल्याण व भिवंडी-ठाणे या मार्गावर पथदिवे लावणेबाबत

**(२८) ३२५१७ (११-०८-२०१७). श्री.अमरिशभाई पटेल, श्री.संजय दत्त :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) भिवंडी-कल्याण व भिवंडी-ठाणे या मार्गाचे रुंदीकरण केले परंतु पथदिवे नसल्याने या मार्गावर वाहनांच्या अपघातात वाढ झाली असल्याची बाब माहे एप्रिल, २०१७ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आली आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, त्यात काय आढळून आले व तद्नुसार उक्त मार्गावर पथदिवे लावून या मार्गावरील अपघात रोखण्यासाठी कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (२९-०१-२०१८) :** (१) व (२) भिवंडी-निजामपूर शहर महानगरपालिकेच्या अहवालानुसार महानगरपालिकेने सदर मार्गावर अपघात रोखण्यासाठी खालीलप्रमाणे उपाययोजना केलेल्या आहेत:-

भिवंडी-निजामपूर शहर महानगरपालिकेची नदीनाका ते अंजुर फाटा जकात नाक्यापर्यंत हद्द असुन या रस्त्यांवर महानगरपालिकेने पथदिव्यांची व्यवस्था केलेली आहे. तसेच रांजनोली नाका ते कल्याण व अंजुर फाटा ते ठाणे हे रस्ते भिवंडी-निजामपूर शहर महानगरपालिकेच्या हद्दीत येत नाहीत.

तथापि, या रस्त्यावर पथदिव्यांची व्यवस्था करण्याबाबत सार्वजनिक बांधकाम विभागास विनंती करण्यात आली आहे.

(३) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## अपंगाच्या कल्याण धोरणांची अंमलबजावणी करण्याबाबत

**(२९) ३२७५५ (१८-०८-२०१७). डॉ.(श्रीमती) नीलम गोऱ्हे :** सन्माननीय **सामाजिक न्याय मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) अपंगाच्या कल्याणासाठी राज्य शासनाने तयार केलेल्या धोरणावर हरकती आणि सूचना शासनास प्राप्त झाल्या आहेत काय,

(२) असल्यास, सदर अपंग कल्याणाचे धोरणावर दिनांक २३ मे, २०१७ पर्यंत हरकती आणि सूचना मांडण्यासाठी मुदत ठेवण्यात आली आहे, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, उक्त धोरणावर अंमलबजावणी केव्हापर्यंत होणार आहे व त्याचे सर्वसाधारण स्वरूप काय आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.राजकुमार बडोले (२९-१२-२०१७) :** (१) व (२) राज्य शासनाच्या प्रस्तावित अपंग कल्याण धोरणाचा मसूदा या विभागाच्या वेबसाईटवर प्रसिध्द करण्यात आला असून त्यानुसार दिनांक २३/०५/२०१७ पर्यंत नागरिकांकडून सूचना व हरकती मागविण्यात आल्या. त्यानुसार नागरिकांकडून सूचना व हरकती प्राप्त झाल्या आहेत.
(३) अपंगांच्या सर्वांगीण विकासाच्या अनुषंगाने सदर प्रस्तावित अपंग कल्याण धोरणाचा मसूदा तयार करण्यात आला आहे.

सदर धोरणाच्या मसूद्याबाबत सर्व प्रशासकीय विभागाकडून अभिप्राय प्राप्त करुन घेण्याची कार्यवाही करण्यात येत असून सर्व प्रशासकीय विभागांचे अभिप्राय प्राप्त झाल्यानंतर त्यानुसार प्रस्तूत अपंग कल्याण धोरणाचा मसूदा मा.मंत्रिमंडळ मान्यतेसाठी सादर करण्यात येईल. मा.मंत्रिमंडळ मान्यतेनंतर सदर अपंग कल्याण धोरणाची अंमलबजावणी करण्यात येईल.
(४) प्रश्नच उद्भवत नाही.

---

**राज्यातील कर्जबाजारी शेतकऱ्यांना संस्थात्मक कर्ज वितरण व्यवस्थेत आणण्याबाबत**

**(३०) ३२८२२ (१८-०८-२०१७). श्री.रामहरी रुपनवर :** सन्माननीय **सहकार मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) राज्यातील कर्जबाजारी शेतकऱ्यांना संस्थात्मक कर्ज वितरण व्यवस्थेत आणण्याचा शासनाचा प्रस्ताव असल्याचे माहे एप्रिल, २०१७ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, या प्रस्तावावर निर्णय घेवून त्याची अंमलबजावणी करण्याबाबत शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.सुभाष देशमुख (०३-०१-२०१८)** : (१) अंशतः खरे आहे. दिनांक २८/०४/२०१७ रोजीच्या राज्यस्तरीय खरीप आढावा सभेमध्ये तसेच दिनांक ०१/०६/२०१७ च्या सभेमध्ये संस्थात्मक कर्जपुरवठा व्यवस्थेबाहेर असलेल्या शेतकऱ्यांना कर्जपुरवठा करून बँक छत्राखाली आणण्याचे आवाहन मा.मुख्यमंत्री महोदयांनी बँकाना केले.
(२) राज्यातील विविध बँकामार्फत शेतकऱ्यांना पीक कर्ज वाटप करण्यात येत आहे. तसेच आर्थिक अडचणीतील १४ जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँकांच्या १६ जिल्ह्यांमध्ये शासन परिपत्रक दिनांक ०६/०६/२०१७ नुसार सुलभ पीक कर्ज अभियान राबविण्यात आले. त्यानुसार दिनांक ३१/७/२०१७ अखेर १९३४ कर्ज मेळाव्याद्वारे ५३३५० शेतकऱ्यांना बँकांमार्फत रुपये ३७९.९४ कोटींचे पीक कर्ज वाटप करण्यात आले. तसेच शासन निर्णय दिनांक १४/०६/२०१७ अन्वये शेतकऱ्यांना शासनहमीवर रुपये १००००/- पर्यंतचे पीक कर्ज देण्याचा निर्णय घेण्यात आला. त्यानुसार दिनांक ३१/८/२०१७ अखेर ५२९६१ शेतकऱ्यांना रुपये ५२.७७ कोटींचे पीक कर्ज वाटप बँकानी केले आहे.
(३) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## राज्यात अनुदानित आश्रमशाळेतील कर्मचाऱ्यांना कायमस्वरुपी भविष्य निर्वाह निधीचा खाते क्रमांक देणेबाबत

**(३१) ३२८७० (१८-०८-२०१७). डॉ.अपूर्व हिरे :** सन्माननीय **आदिवासी विकास मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) राज्यात अनुदानित आश्रमशाळांमधील एका प्रकल्पात कार्यरत कर्मचाऱ्यांचे दुसऱ्या प्रकल्पात बदली झाल्यानंतर भविष्य निर्वाह निधीचे खाते क्रमांक हे बदलत असल्याने प्रशासकीय व आर्थिकदृष्टया अनेक अडचणी निर्माण होत आहेत, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, अन्य विभागात प्रकल्प/विभाग निहाय भविष्य निर्वाह निधी खाते क्रमांक बदलण्याची सक्ती नसतांना अनुदानित आश्रमशाळांसाठी मात्र प्रकल्पनिहाय खाते क्रमाकांची सक्ती असल्याने सदर कर्मचाऱ्यांना मुलींचे लग्न वा अन्य प्रसंगी भविष्य निर्वाह निधीची रक्कम मिळण्यात अनेक अडचणी येऊन आर्थिक अडचण निर्माण होत असल्याचे निदर्शनास आले, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, राज्यात अनुदानित आश्रमशाळात कार्यरत कर्मचाऱ्यांचे भविष्य निर्वाह निधीचे खाते प्रकल्पनिहाय न बदलता अन्य विभागाप्रमाणे एकदाच सदर खाते क्रमांक देण्याबाबत शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.विष्णु सवरा (०३-०१-२०१८) :** (१) हे खरे नाही.
(२) व (३) प्रकल्पनिहाय खाते क्रमांक ठेवल्याने कर्मचाऱ्यांना लग्न वा अन्य प्रसंगी भविष्य निर्वाह निधीची रक्कम मिळण्यात अडचणी येत असल्याबाबत कोणतीही तक्रार शासनास प्राप्त झालेली नाही.
(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

**राज्यातील अत्याचार पिडीत महिलांच्या आर्थिक मदतीत वाढ करण्याबाबत**

**(३२) ३२९१० (११-०८-२०१७). श्री.प्रकाश गजभिये :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) राज्यात महिलांवर होत असलेल्या अत्याचाराच्या व ॲसिड हल्ल्याच्या घटनेत वाढ होत असून त्यातील पिडीतांना अत्यल्प आर्थिक मदत मिळत असल्याने शासनाने यात वाढ करण्याचा निर्णय माहे मे, २०१७ मध्ये वा त्यादरम्यान घेतला आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, ही वाढ किती प्रमाणात करण्यात आलेली आहे व त्याचा लाभ आतापर्यंत किती अत्याचार पिडीत महिलांना देण्यात आला आहे,
(३) असल्यास, ही वाढ पूर्वलक्षी प्रभावाने देण्यात येणार आहे काय,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (१५-०१-२०१८) :** (१), (२) व (३) महाराष्ट्रात बळी पडलेल्या व्यक्तींकरीता नुकसान भरपाई योजना २०१४ सुधारित केली असून यामध्ये दिनांक ७ एप्रिल, २०१७ रोजी नुकसान भरपाई रकमेत वाढ करण्यात आली आहे. सदर योजनेमध्ये सन २०१४ ते २०१७ या कालावधीत १२९ लाभार्थ्यांना नुकसान भरपाई देण्यात आली आहे. उक्त योजना पात्र प्रकरणांना दिनांक ३१/१२/२००९ पासून लागू आहे.
(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

**रायगड येथील समाजकल्याण सहायक आयुक्त कार्यालयातील रिक्त पदे भरण्याबाबत**

**(३३) ३२९२९ (१८-०८-२०१७). श्री.प्रविण दरेकर :** सन्माननीय **सामाजिक न्याय मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) रायगड येथील सामाजिक न्याय विभागांतर्गत असलेल्या समाजकल्याण सहायक आयुक्त कार्यालयातील अनेक रिक्त पदांवर कंत्राटी कर्मचारी कार्यरत असल्याचे माहे जून, २०१७ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, यामुळे सामाजिक न्याय विभागांतर्गत राबविण्यात येणाऱ्या विविध योजनांवर परिणाम होत असल्याने सदर रिक्त पदे भरण्याबाबत शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येणार आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.राजकुमार बडोले (०४-०१-२०१८) :** (१) व (२) अंशत: खरे आहे.

वेतनावरील खर्च नियंत्रित करण्याच्या अनुषंगाने वित्त विभागाच्या निदेशानुसार इतर संवर्गातील सरळसेवेच्या कोटयातील पद भरतीस निर्बंध असल्याने वाहन चालक, संगणक ऑपरेटर हया पदावर कंत्राटी कर्मचारी कार्यरत असून, सध्या उपलब्ध असलेल्या कर्मचाऱ्यांकडून कामकाज करुन घेण्यात येत आहे.

तसेच शासनाच्या धोरणानुसार सुधारित आकृतीबंध तयार केला असून वित्त विभागाच्या मान्यतेसाठी सादर केला आहे. आकृतिबंधाच्या मान्यतेनंतर रिक्त पदे भरण्याची कार्यवाही करण्याचे प्रस्तावित आहे.
(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

## राज्यातील अनुदानित शाळेतील अनुकंपा तत्वावर शिक्षक-शिक्षकेतर कर्मचाऱ्यांची नियुक्ती करण्यास परवानगी देण्याबाबत

**(३४) ३३०५५ (११-०८-२०१७). डॉ.सुधीर तांबे :** सन्माननीय **शालेय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) राज्यातील अनुदानित शाळेतील शिक्षक-शिक्षकेतर यांची अनुकंपा तत्वावर जागा भरण्यास परवानगी दिली जात नाही, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन सदर शिक्षकांच्या जागा भरण्याबाबत परवानगी देण्याविषयी कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.विनोद तावडे (१२-०१-२०१८) :** (१) व (२) अंशत: खरे आहे.

शिक्षकांच्या रिक्त पदावर अनुकंपा तत्वावर भरती करण्याबाबत शासन निर्णय दिनांक २० जानेवारी, २०१६ मधील तरतूदीनुसार कार्यवाही करण्यात येते. तथापि शिक्षकेतर कर्मचारी पदांचा आकृतिबंध निश्चित करण्याबाबत कार्यवाही सुरु असून आकृतिबंध निश्चित झाल्यानंतर सदर रिक्त पदे भरण्याची कार्यवाही करण्यात येईल.
(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

## हिंगोली जिल्हयातील शिक्षक व शिक्षकेतर कर्मचाऱ्यांच्या वैयक्तिक मान्यतेबाबत

**(३५) ३३३२१ (११-०८-२०१७). श्री.रामराव वडकुते :** सन्माननीय **शालेय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) हिंगोली जिल्हयातील दिनांक २ मे, २०१२ नंतर शिक्षक व शिक्षकेतर कर्मचाऱ्यांच्या वैयक्तिक मान्यतेला मंजुरी देऊ नये असे शासनाने स्पष्ट आदेश दिलेले आहेत, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, शासनाचे स्पष्ट आदेश असतानाही हिंगोली जिल्हयातील तत्कालीन शिक्षणाधिकाऱ्यांनी खाजगी शैक्षणिक संस्थांमधून ६९ शिक्षक व शिक्षकेतर कर्मचाऱ्यांच्या वैयक्तिक मान्यतेला मंजूरी दिल्याचे शिक्षण आयुक्त कार्यालयाच्या माहे मे, २०१७ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.विनोद तावडे (३१-०१-२०१८) :** (१) हे खरे नाही.

(२) व (३) अंशत: खरे आहे, वैयक्तिक मान्यता प्रदान प्रकरणी अनियमितता झाल्याच्या ३९ प्रकरणांची पडताळणी शिक्षण आयुक्त स्तरावर करण्यात आली. त्यापैकी २७ प्रकरणी प्रथमदर्शनी अनियमितता झाल्याचे दिसून आले.

(४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## राज्यातील जिल्हा निहाय जात पडताळणी समित्या कायम ठेवण्याबाबत

**(३६) ३३३४३ (१८-०८-२०१७). श्री.विनायकराव मेटे :** सन्माननीय **सामाजिक न्याय मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यातील ३६ जिल्हा जात पडताळणी समितीच्या वैधतेला आवाहन देणारी याचिका औरंगाबाद खंडपीठात दाखल करण्यात आली होती, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, सदर जिल्हा निहाय जात पडताळणी समित्या कायम ठेवण्यासाठी शासन सकारात्मक भूमिका घेणार आहे काय,
(३) नसल्यास, त्याची कारणे काय आहेत ?

**श्री.राजकुमार बडोले (०५-०१-२०१८) :** (१) होय.
जिल्हानिहाय जात प्रमाणपत्र पडताळणी समित्यांच्या वैधतेच्या अनुषंगाने Human Development Foundation यांनी उच्च न्यायालयाचे औरंगाबाद खंडपीठ येथे PIL १५४/२०१६ दाखल केलेली आहे.
(२) जिल्हानिहाय जात प्रमाणपत्र पडताळणी समित्या कायम ठेवण्यासाठी शासनाने सकारात्मक भूमिका घेवून त्याप्रमाणे प्रस्तुत जनहित याचिकेच्या प्रकरणी शपथपत्र दाखल केलेले आहे.
(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

**मौजे मांडवे तर्फे बामणगाव (ता.अलिबाग, जि.रायगड) येथील अनधिकृत बांधकाम हटविण्याबाबत**

**(३७) ३३८०९ (०७-०८-२०१७). श्री.रामहरी रुपनवर :** सन्माननीय **सार्वजनिक बांधकाम (सार्वजनिक उपक्रम वगळून) मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) मौजे मांडवे तर्फे बामणगाव (ता.अलिबाग, जि.रायगड) येथील सर्व्हे नं. ५१/९ या जागेत बांधकामास मंजूरी दिलेल्या क्षेत्राबाहेर अनधिकृत बांधकाम करण्यात आल्याचे माहे जून, २०१६ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, सार्वजनिक बांधकाम विभागाच्या नियमानुसार रस्त्यांच्या मध्यापासून ४० मीटरच्या आत बांधकाम करण्यात येऊ नये अशी अट असतांना निलेश जयहिंद मोरे यांनी नियमांचा भंग करून अवैधरित्या १२.३० मीटर अंतरावर बांधकाम केल्यामुळे याबाबत स्थानिक नागरिकांनी जिल्हाधिकारी, रायगड, तहसिलदार, मंडळ अधिकारी व तलाठी यांच्याकडे माहे मार्च-एप्रिल, २०१७ मध्ये वा त्यादरम्यान तक्रारी करूनही कोणतीच कारवाई करण्यात आली नाही, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीच्या अनुषंगाने अनधिकृत बांधकाम करणाऱ्यांवर कारवाई करून सदर अनधिकृत बांधकाम हटविण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.चंद्रकांत पाटील (२४-०१-२०१८) :** (१) हे खरे आहे. श्री.निलेश जयहिंद मोरे यांनी रस्त्याच्या मध्यापासून १२.३० मीटर अतंरावर बांधकाम केलेले आहे.
(२) अनधिकृत बांधकाम प्रकरणी तहसिलदार, अलिबाग यांनी दिनांक २५/०८/२०१४ व दिनांक ०५/०९/२०१४ रोजी नोटीस बजावून दंडनिय रक्कम रुपये ७३,८००/- शासन जमा केली आहे.
(३) होय, सदरहू बांधकाम निष्कासित करणेबाबत दिनांक २९/०६/२०१७ रोजी नोटीस देण्यात आली आहे.
तसेच, तहसिलदार अलिबाग यांच्या दिनांक २४/११/२०१७ च्या पत्रानुषंगाने श्री.मोरे यांना देण्यात आलेली बिनशेती व बांधकाम परवानगी रद्द करणेबाबतची कार्यवाही सुरु आहे.
(४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

**आश्रमशाळांमधील विद्यार्थ्यांना मुलभूत सुविधा न पुरविणाऱ्या आश्रमशाळा व संस्थाचालकांवर कारवाई करण्याबाबत**

**(३८) ३४०२७ (१८-०८-२०१७). श्री.परिणय फुके :** सन्माननीय **आदिवासी विकास मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) आदिवासी विकास विभागाच्या नियंत्रणातील शासकीय आणि अनुदानित आश्रमशाळांमध्ये विद्यार्थ्यांना मुलभूत सोयीसुविधा न पुरविल्यास १५ दिवसाच्या आत सदर आश्रमशाळांची मान्यता रद्द करण्याचे आदेश संस्थाचालक व मुख्याध्यापकांना शासनाकडून दिनांक १२ जानेवारी, २०१७ रोजी नोटीसव्दारे कळविण्यात आले आहेत, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, सदर आदेशाची अंमलबजावणी न करणाऱ्या किती आश्रमशाळा व संस्थाचालकांवर कारवाई केली वा करण्यात आली आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.विष्णु सवरा (०३-०१-२०१८)** : (१) आयुक्तालयाच्या दिनांक १२ जानेवारी, २०१७ च्या पत्रान्वये विद्यार्थ्यांची दिनचर्या व आहार देणेबाबतच्या सूचना निर्गमित करण्यात आल्या आहेत.
(२) आदिवासी विकास विभागांतर्गत असलेल्या ५५६ अनुदानित आश्रमशाळांपैकी मुलभूत सोयी सुविधा न पुरविणाऱ्या १६ अनुदानित आश्रमशाळांची मान्यता रद्द करण्यात आली आहे.
(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

## मुंबई विद्यापीठाच्या परीक्षांमध्ये प्रश्नपत्रिकांचा गैरप्रकार झाल्याबाबत

**(३९) ३४०५५ (११-०८-२०१७). श्री.जनार्दन चांदूरकर** : सन्माननीय **उच्च व तंत्र शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) मुंबई विद्यापीठाच्या परीक्षांमध्ये प्रश्नपत्रिकांचा होणारा गैरवापर टाळण्यासाठी सुरक्षेचा उपाय म्हणुन लागु करण्यात आलेल्या वॉटरमार्क पध्दतीमुळे विद्यार्थ्यांना प्रश्न निट दिसण्यास गैरसोय होत असल्याचे वडाळा मुंबईच्या एका महाविद्यालयात दिनांक २२ एप्रिल, २०१७ रोजी वा त्यासुमारास निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.विनोद तावडे (२९-०१-२०१८)** : (१) व (२) दिनांक ०५/०४/२०१७ रोजी मुंबई विद्यापीठाने २५० परीक्षा केंद्रावर घेतलेल्या परीक्षेपैकी फक्त वडाळा परीक्षा केंद्रावरील विद्यार्थ्यांनी प्रश्नपत्रिकेवरील वॉटरमार्क गडद असल्याने प्रश्नपत्रिकेतील प्रश्नांचे अंक स्पष्ट दिसत नसल्याबाबत तक्रार केली होती. सदर बाब लक्षात येताच मुख्य पर्यवेक्षक व प्राचार्य यांनी पुन्हा प्रश्नपत्रिका प्रिंट करुन परीक्षा केंद्रातील सर्व विद्यार्थ्यांच्या शंकेचे निरसन करुन विद्यार्थ्यांना पेपर लिहिण्यास वाढीव १५ मिनिटे दिली. सदर विद्यापीठाने दिनांक ०६/०४/२०१७

रोजी दोन सदस्यांची तज्ञ समिती महाविद्यालयात पाठवून चौकशी केली असता त्यामध्ये विद्यापीठाचा काहीही दोष नसून सदर महाविद्यालयाने प्रिंट करण्यासाठी इन्स्टॉल केलेल्या सॉफ्टवेअरमध्ये दोष आढळून आला तेव्हा सदर तज्ञ समितीने तात्काळ नवीन सॉफ्टवेअर Foxit Reader हे इन्स्टॉल करण्याची सूचना केली असता महाविद्यालयाने त्याचे पालन केले आहे व पुढील सर्व दिवसांच्या परीक्षा व्यवस्थित प्रश्नपत्रिकेवर वॉटरमार्क येऊन पार पडल्या आहेत.

या संदर्भात विद्यार्थ्याकडून परीक्षा विभागास निवेदन प्राप्त होताच सदर बाब परीक्षा मंडळाच्या दिनांक ०८/०४/२०१७ च्या सभेत ठेवण्यात आली. परीक्षा मंडळाने याबाबत प्राचार्यांनी दिलेल्या खुलाशानुसार विद्यार्थ्यांच्या शंकेचे निरसन ११.४५ मिनिटाने झाल्याने व विद्यार्थ्यांना १५ मिनिटे ज्यादा वेळ वाढवून दिल्याने विद्यार्थ्यांचे कुठल्याही प्रकारचे नुकसान झालेले नाही. त्यामुळे सदर प्रकरणी परीक्षा मंडळाकडून कुठलीही कारवाई सुचित करण्यात आली नाही.
(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

## डहाणू (जि.पालघर) नगरपरिषदेच्या जलमापकाच्या खरेदीमध्ये गैरव्यवहार झाल्याबाबत

**(४०) ३४१५७ (११-०८-२०१७). श्री.आनंद ठाकूर :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) डहाणू (जि.पालघर) नगरपरिषदेच्या दिनांक ३ नोव्हेंबर, २०११ रोजीच्या जलमापकाच्या खरेदीमध्ये गैरव्यवहार झाल्याची बाब माहे मार्च, २०१७ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आली आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, त्यात काय आढळून आले व तद्नुसार या प्रकरणात दोषी असलेल्या व्यक्तींवर कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (३०-०१-२०१८) :** (१) डहाणू नगरपरिषदेने जलमापक खरेदीत गैरव्यवहार केल्याबाबत नगरपरिषद प्रशासनास तक्रारी प्राप्त झाल्या आहेत, हे खरे आहे.

(२) दरम्यानच्या कालावधीत सदर गैरव्यवहाराबाबत तक्रारदाराने मा.प्रथमवर्ग न्यायदंडाधिकारी, डहाणू यांच्या न्यायालयात याचिका दाखल केली आहे. सदर याचिकेमध्ये मा.न्यायालयाने दिलेल्या आदेशान्वये स्थानिक पोलीस स्टेशन, डहाणू यांच्यामार्फत चौकशी सुरु आहे.
(३) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

### मुंबई विद्‌यापीठातील संगणक (ऑनस्क्रीन) मुल्यांकनाच्या गोंधळाबाबत

**(४१) ३४६६१ (१६-११-२०१७). श्री.धनंजय मुंडे :** सन्माननीय **उच्च व तंत्र शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) मुंबई विद्‌यापीठातील संगणक (ऑनस्क्रीन) मुल्यांकनाच्या गोंधळामुळे विखुरलेल्या दोन हजार उत्तरपत्रिका गहाळ झाल्याचे माहे सप्टेंबर, २०१७ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, गहाळ झालेल्या उत्तरपत्रिकेमुळे विद्‌यार्थ्यांमध्ये संभ्रमाचे, निराशाचे, संतापाचे वातावरण निर्माण झाले आहे, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन विद्‌यापीठाच्या गोंधळास जबाबदार कुलगुरु, मा.उच्च तंत्रशिक्षण मंत्री व विभागाचे सचिव यांच्यावर कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.विनोद तावडे (२९-०१-२०१८) :** (१) हे खरे नाही.
(२) हे खरे नाही.
(३) प्रश्न उद्‌भवत नाही.
(४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

### कलदगाव (ता.भोकर, जि.नांदेड) येथे राष्ट्रीय महामार्गाच्या मुख्य रस्त्याच्या बाजूला खोदकाम केलेल्या ठिकाणी सूचनाफलक लावण्याबाबत

**(४२) ३५५७६ (०३-०१-२०१८). श्री.अमरनाथ राजूरकर, श्री.संजय दत्त :** सन्माननीय **सार्वजनिक बांधकाम (सार्वजनिक उपक्रम वगळून) मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) कलदगाव (ता.भोकर, जि.नांदेड) येथे राष्ट्रीय महामार्गाच्या तीन पदरी कामाला सुरुवात झाली असून मुख्य रस्त्याच्या बाजूला खोदकाम केले असून उक्त ठिकाणी संबंधित कंत्राटदार व अधिकारी यांनी दुर्लक्ष केल्यामुळे कोणतेही सूचनाफलक न लावल्याने सदर ठिकाणी अपघात होत आहेत, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीच्या अनुषंगाने सदर ठिकाणी सूचनाफलक लावण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.चंद्रकांत पाटील (१५-०१-२०१८) :** (१) हे खरे नाही.
(२) कल्याण निर्मल राष्ट्रीय महामार्ग ६१ (जुना २२२) च्या कि.मी. ५५८/२०० ते ६१५/०० हया भागात पेव्हड शोल्डरसह दुपदरीकरणाच्या सुरु असलेल्या प्रकल्पामध्ये कलदगाव (ता.भोकर, जि.नांदेड) या दरम्यान चालू असलेल्या कामाच्या ठिकाणी अपघात न झाल्यामुळे चौकशी करण्याचा प्रश्न उद्‌भवत नाही. परंतु वाहतुक सुरळीत ठेवण्याच्या दृष्टीकोणातुन EPC अंतर्गत चालू असलेल्या उक्त कामाच्या खोदकामाच्या ठिकाणी आवश्यक त्या उपाययोजना (सूचनाफलक, सुरक्षा पट्टी, इत्यादी करुनच काम करण्यात येत आहे.
(३) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

**राज्यातील खाजगी व्यवस्थापनाच्या शाळांना वेतनेतर अनुदान देणेबाबत**

**(४३) ३५७५३ (०२-०१-२०१८). श्री.दत्तात्रय सावंत, श्री.श्रीकांत देशपांडे :** सन्माननीय **शालेय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) राज्यातील खाजगी व्यवस्थापनाच्या शाळांना दिनांक १९ जानेवारी, २०१३ च्या शासन निर्णयानुसार माहे मार्च, २००८ पूर्वी १०० टक्के अनुदानावर आलेल्या शाळांना ४ टक्के वेतनेतर व १ टक्के इमारत भाडे अनुदान दिले जाते, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, राज्यात दिनांक १ एप्रिल, २००८ नंतर २००० पेक्षा जास्त शाळा १०० टक्के अनुदानावर असून सदर शाळांनाही वेतनेतर अनुदान दिले जात नाही, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, उक्त शाळांना वेतनेतर अनुदान दिले जावे याबाबत महाराष्ट्र राज्य शाळा कृती समिती या शिक्षक संघटनेकडून शासनास निवेदन देण्यात आले आहे, हे ही खरे आहे काय,
(४) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन माहे मार्च, २००८ नंतर १०० टक्के अनुदानावर आलेल्या शाळांना ही वेतनेतर अनुदान देणेबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.विनोद तावडे (३०-०१-२०१८) :** (१) होय.
(२) नाही. शासन निर्णय, दिनांक १९ जानेवारी, २०१३ मधील अटी व शर्तींची पूर्तता करणाऱ्या शाळांना वेतनेतर अनुदान उपलब्ध करुन देण्यात येते.
(३) या बाबतचे निवेदन प्राप्त झाले आहे.
(४) व (५) प्रश्न उद्भवत नाही.

---

**डॉ.रखमाबाई राऊत (सावे) यांची दरवर्षी जयंती साजरी करण्याबाबत**

**(४४) ३६१५६ (०४-०१-२०१८). श्री.जयवंतराव जाधव, श्री.अमरसिंह पंडित, श्री.धनंजय मुंडे, श्री.नरेंद्र पाटील : दिनांक १६ डिसेंबर, २०१६ रोजी सभागृहाच्या पटलावर ठेवण्यात आलेल्या अतारांकित प्रश्नोत्तरांच्या यादी क्रमांक ७ मधील प्रश्न क्रमांक २०२६२ ला दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) डॉ. रखमाबाई राऊत (सावे) यांचा जन्म दिनांक २२ नोव्हेंबर, १८६४ रोजी झाला असून त्या भारतातील प्रथम महिला डॉक्टर होत्या त्यांनी सामाजिक अनिष्ट रुढी परंपरांविरुध्द लढून समाजातील दीनदुबळयांची सेवा केली अशा या महान व्यक्तीची जयंती साजरी केली जात नसल्याने दरवर्षी दिनांक २२ नोव्हेंबर रोजी जयंती साजरी करण्याबाबतची मागणी लोकप्रतिनिधींनी दिनांक २७ फेब्रुवारी, २०१७ रोजी वा त्यासुमारास शासनाकडे केलेली आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, उक्त निवेदनाच्या अनुषंगाने डॉ.रखमाबाई राऊत यांची जयंती दरवर्षी दिनांक २२ नोव्हेंबर रोजी साजरी करण्याबाबत शासनामार्फत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (१९-०१-२०१८) :** (१) होय, हे खरे आहे.
(२) व (३) सन २०१८ या वर्षामध्ये राष्ट्रपुरुष / थोर व्यक्ती यांचे जयंती व राष्ट्रीय दिन निश्चित करताना प्रश्नांकित निवेदनासह जयंती साजरी करण्याबाबतच्या नव्याने प्राप्त झालेल्या मागण्या विचारात घेण्यात आल्या. अशा मागण्या खूप मोठ्या प्रमाणात करण्यात येत असल्याने सर्वच मागण्या मान्य करणे शक्य होत नाहीत.

---

## नाशिक जिल्हयातील ब्रिटीशकालीन व सुरक्षा कालावधी संपलेल्या पुलावरील वाहतुक बंद करून पर्यायी उपाययोजना करण्याबाबत

**(४५) ३६२८७ (०३-०१-२०१८). डॉ.अपूर्व हिरे : तारांकित प्रश्न क्रमांक २७८३० ला दिनांक २४ मार्च, २०१७ रोजी दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **सार्वजनिक बांधकाम (सार्वजनिक उपक्रम वगळून) मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) नाशिक जिल्हयातील ब्रिटीशकालीन व सुरक्षा कालावधी संपलेल्या मुंबई आग्रा महामार्ग गोदावरी नदीवरील कन्नमवार पुलाच्या पुनर्बांधणीची केंद्र शासनामार्फत सुरु असलेली निविदा प्रक्रिया पुर्ण झाली आहे काय,
(२) असल्यास, नाशिक येथील मुंबई महामार्गावर असलेला व वाहतुकीस धोकादायक ठरविण्यात आलेला असूनही सद्य:स्थितीत वापरात असलेल्या कन्नमवार पुलाच्या पुनर्बांधणीबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(३) असल्यास, नाशिक जिल्हयातील कमकुवत पुलांची माहिती सार्वजनिक बांधकाम विभागाने वर्षभरानंतरही जिल्हा प्रशासनास सादर न केल्याने जिल्हाधिकारी (नाशिक) यांनी प्रस्तुत विभागास अल्टिमेटम दिल्याचे दिनांक ३१ मे, २०१७ रोजी वा त्यासुमारास निदर्शनास आले, हे ही खरे आहे काय,
(४) असल्यास, राज्यातील सर्व जुन्या पुलाचे स्ट्रक्चरल ऑडीट पुर्ण करून धोकादायक पुलावरील वाहतुक बंद करावी, असे आदेश मा.मुख्यमंत्री महोदयांनी दिनांक ३१ मे, २०१७ रोजी वा त्यासुमारास मुंबई येथे मान्सुन पुर्व आढावा

बैठकीत दिलेले असतांना कमकुवत पुलांची माहिती शासनास सादर न होणे तसेच गोदावरी वरील सायखेडा येथील जुना पुल खचल्याने धोकादायक असुनही त्यावरून अवजड वाहतुक सुरु असणे, नांदुर मध्यमेश्वर धरणाच्या डाव्या कालव्यावरील ब्रिटीशकालीन पुल जीर्ण झाल्यामुळे पर्यायी व्यवस्थेसाठी केलेला कच्चा पुलही धोकादायक असणे व घोटी येथील दारणा नदीवरील पुल इत्यादी व अन्य सुरक्षा कालावधी संपलेले जीर्ण, कमकुवत पुलांचे स्ट्रक्चरल ऑडीट होऊन त्यावरील वाहतुक थांबविणे व पर्यायी व्यवस्थेविषयक शासनाने चौकशी करून कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.चंद्रकांत पाटील (१५-०१-२०१८) :** (१) होय. निविदा प्रक्रिया पूर्ण झाली असून कार्यारंभ आदेश दिनांक १२/०६/२०१७ रोजी देण्यात आल्याचे प्रकल्प संचालक, भारतीय राष्ट्रीय राजमार्ग प्राधिकरण यांनी कळविले आहे.
(२) हे खरे नाही. सदर पुलाची पुनर्बांधणी मे.बी.पी.सांगले यांना ई.पी.सी. तत्वावर देण्यात आलेले असून अस्तित्वातील जुना पुल पाडण्याचे काम प्रगतीत असून सदर काम पूर्ण होताच पुलाचे पुनर्बांधणीचे काम हाती घेण्यात येणार आहे. संपूर्ण काम पूर्ण करण्याची मुदत ३० महिने असून काम माहे डिसेंबर, २०२० पर्यंत पूर्ण करण्याचे नियोजन असल्याचे प्रकल्प संचालक, भारतीय राष्ट्रीय राजमार्ग प्राधिकरण, नाशिक यांनी कळविले आहे.
(३) हे खरे नाही. तथापि नाशिक जिल्हयातील सार्वजनिक बांधकाम विभागाचे पुल कमकुवत झाल्याचे निदर्शनास आल्यास त्यावरील वाहतूक बंद करणे अथवा अन्यत्र वळविणे याबाबत जिल्हा प्रशासनास वेळोवेळी कळविण्यात येत असते.
(४) सायखेडा ता.निफाड येथील गोदावरील नदीवरील कमकुवत पुलाची जून, २०१६ मध्ये तात्पुरती दुरुस्ती करुन पुलावरुन अवजड वाहतुक बंद करण्यात आली आहे. तसेच जून, २०१७ मध्ये पुलाची कायमस्वरुपी दुरुस्ती हाती घेण्यात आली आहे.

घोटी सिन्नर मार्गावरील दारणा नदीवरील पुलाचा क्षतिग्रस्त डेक स्लॅबची दुरुस्ती पूर्ण करुन २ ऑगस्ट, २०१७ पासून पुल वेग मर्यादेत हलक्या वाहनांच्या वाहतुकीसाठी खुला करण्यात आला आहे. पुलाच्या दुरुस्तीचे काम प्रगतीत असल्याने सदरचा पुल अवजड वाहतुकीसाठी बंद करण्यात आलेला आहे.
(५) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## औरंगाबाद या ऐतिहासिक शहरापासून अंजिठा या पर्यटन स्थळाला जोडणारा राज्यमार्ग चौपदरीकरणाबाबत

**(४६) ३७१३० (०३-०१-२०१८). श्री.विक्रम काळे : तारांकित प्रश्न क्रमांक ३३५९६ ला दिनांक ३१ जुलै, २०१७ रोजी दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **सार्वजनिक बांधकाम (सार्वजनिक उपक्रम वगळून) मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) औरंगाबाद शहरापासून अंजिठा या पर्यटन स्थळाला जोडणाऱ्या राज्यमार्गाचे चौपदरीकरणाबाबत अद्याप कार्यवाही करण्यात आली नाही, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीच्या अनुषंगाने राज्यमार्ग चौपदरीकरण करण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.चंद्रकांत पाटील (१५-०१-२०१८) :** (१) व (२) हे खरे नाही.

नव्याने घोषित राष्ट्रीय महामार्ग ७५३ फ च्या औरंगाबाद-सिलोड-फर्दापूर हया १०० कि.मी. रस्त्याचे पेव्हड शोल्डरसह दुपदरीकरण व प्रमुख गावांमध्ये चौपदरीकरणाच्या कामासाठी दोन पॅकेजमध्ये कंत्राटदारासोबत करारनामा झाला असून मे, २०१९ अखेर काम पूर्ण करण्याचे नियोजन आहे. हया लांबीमध्ये औरंगाबाद-अजिंठा हया महामार्गाचा समावेश आहे.

(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

## राज्यातील भटक्या व विमुक्त जातीच्या अधिकारी बढती बद्दल महिती उपलब्ध नसल्याबाबत

**(४७) ३७५१३ (०४-०१-२०१८). श्रीमती स्मिता वाघ :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यातील शासकीय अधिकाऱ्यांना बढतीत आरक्षण देण्यात येऊ नये असा निकाल मा.मुंबई उच्च न्यायालयाने दिल्यानंतर या निकालाच्या पार्श्वभूमीवर राज्याचे मुख्य सचिव यांनी शासकीय खात्यांच्या संबंधित सचिवांच्या बैठकीत

विविध जातीचे किती अधिकारी बढती मिळण्याच्या प्रतिक्षा प्रक्रियेत आहेत यांची माहिती घेताना भटक्या व विमुक्त आणि “क’ जातींची अधिकृत व अद्यावत माहिती प्रशासनाकडे नसल्याचे निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, राज्यातील जातीनिहाय शासकीय अधिकाऱ्यांच्या बढतीची नोंद न ठेवण्यासाठी जे सक्षम अधिकारी जबाबदार आहेत त्यांच्यावर कोणती कारवाई करण्याचा निर्णय घेतला आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (३०-०१-२०१८) :** (१) व (२) राज्यात शासकीय अधिकाऱ्यांच्या बढतीची नोंद जातनिहाय ठेवण्यात येत नसून प्रवर्गनिहाय ठेवण्यात येते. राज्यातील विविध संवर्गातील प्रवर्गनिहाय रिक्त पदे भरण्याची कार्यवाही संबंधित विभागामार्फत केली जाते व त्याची माहिती त्या त्या विभागाकडे उपलब्ध असते.
(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

## मुंबई आझाद मैदान येथे उसळलेल्या दंगलीमध्ये जखमी होऊन मृत झालेल्या पोलीस शिपाई संतोष हांडे यांच्या वारसांना मदत देण्याबाबत

**(४८) ४३७६२ (१६-०८-२०१३). ॲड.जयदेव गायकवाड, श्री.नरेंद्र पाटील :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) मुंबई आझाद मैदान येथे सन २०१२ मध्ये उसळलेल्या दंगलीमध्ये जखमी होऊन मृत झालेल्या पोलीस शिपाई संतोष हांडे यांच्या वारसांना मदत देण्याबाबत मा.मुख्यमंत्री व मा.गृहमंत्री यांचेकडे देशभक्त पत्रकार मंचच्यावतीने माहे मे, २०१३ मध्ये वा त्यादरम्यान मागणी केली आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास उक्त मागणीच्या अनुषंगाने मदत देणेबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (०८-०१-२०१८) :** (१) देशभक्त पत्रकार मंच यांचा अर्ज दिनांक १९/११/२०१३ रोजी आझाद मैदान पोलीस ठाणेस प्राप्त झाला आहे.
(२) व (३) मयत पोलीस कर्मचारी संतोष हांडे यांच्या पत्नी श्रीमती मनिषा हांडे यांना अनुकंपा तत्वावर पोलीस शिपाई या पदावर पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई येथे नियुक्ती करण्यात आलेली आहे.

---

**राज्यातील प्रमुख शहरात उभारण्यात आलेले रात्र निवारे बंद करण्याबाबत**

**(४९) ४७६२९ (२७-०१-२०१४). श्री.विक्रम काळे :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) राज्यातील प्रमुख शहारात उभारण्यात आलेल्या रात्र निवाऱ्यात आत्महत्या होत असल्याने अनावश्यक निवारे बंद करण्याची मागणी सर्व स्तरातुन होत आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, उक्त मागणीच्या अनुषंगाने शासनाने आतापर्यंत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे.
(३) अद्याप कोणतीच कार्यवाही केली नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत?

**श्री.देवेंद्र फडणवीस (०३-०१-२०१८) :** (१) राज्यातील महानगरपालिकांकडून प्राप्त अहवालानुसार अशा स्वरुपाची मागणी झाल्याचे निदर्शनास आलेले नाही.
(२) व (३) प्रश्न उद्भवत नाही.

---

**पुणे येथील पोलीस दलातील वस्तीसाठी फिरणाऱ्या गाडयांवरील जीपीएस यंत्रणेची दुरुस्ती करण्याबाबत**

**(५०) ५००२३ (०३-०७-२०१४). श्री.अनिल भोसले, ॲड.जयदेव गायकवाड, श्री.जयवंतराव जाधव :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) पुणे येथील पोलीस दलातील सर्व गाडयांचे लोकेशन करण्यासाठी दुर्घटना घडल्यानंतर ताबडतोब घटना स्थळी पोहचता यावे ही कामे नियंत्रण कक्षातून करता यावी यासाठी सुरु केलेली जीपीएस यंत्रणा गस्तीसाठी फिरणाऱ्या गाडयावरील ही यंत्रणा बंद पडली आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, केव्हा पासून,
(३) असल्यास, सदर यंत्रणा पूर्ववत सुरु करण्याबाबत कोणती उपाययोजना केली वा करण्यात येत आहे ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (१७-०१-२०१८) :** (१), (२) व (३) पुणे पोलीस आयुक्तालयांतर्गत डिझास्टर रुमला लागलेल्या आगीमुळे मुख्य डोमेन सर्व्हर व जीपीएस सर्व्हर नादुरुस्त झाल्याने जीपीएस यंत्रणा बंद झाली होती. तथापि, गृह विभागाच्या दिनांक ११/१२/२०१७ च्या शासन निर्णयान्वये पोलीस आयुक्त, पुणे शहर यांचेकडील ५०० शासकीय वाहनांवर नव्याने जीपीएस यंत्रणा खरेदी करण्यासाठी व वार्षिक देखभाल दुरुस्तीसाठी प्रशासकीय मान्यता देण्यात आलेली आहे.

---

**विधान भवन :** **डॉ. अनंत कळसे**
**मुंबई.** **प्रधान सचिव,**
**महाराष्ट्र विधानपरिषद.**

मुद्रणपूर्व सर्व प्रकिया महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालयाच्या संगणक यंत्रणेवर करण्यात आली आहे.
मुद्रण: शासकीय मुद्रणालय, मुंबई.